|| ॐ श्रीगणेशाय नमः ||
|| श्रीशेगांवस्थिताय श्रीगजाननमहाराजाय नमः ||

# पोथी अभंगवृत्तात
## रचयिता - श्रीपाद लक्ष्मण अभ्यंकर



| अध्यायक्रमांक | येथील पदें | गजानन-विजयमध्ये ओव्या |
|---|---|---|
| १ | २० | १४६ |
| २ | ४२ | १४८ |
| ३ | ३९ | १५२ |
| ४ | ५० | १५५ |
| ५ | ४८ | १५४ |
| ६ | ३१ | १४५ |
| ७ | ३० | १५१ |
| ८ | ४८ | १५५ |
| ९ | ५० | १५४ |
| १० | ५२ | १७१ |
| ११ | ५७ | १९३ |
| १२ | ४६ | १५१ |
| १३ | ४९ | १७९ |
| १४ | ४३ | १५२ |
| १५ | २८ | १४१ |
| १६ | ३२ | १५० |
| १७ | ४७ | १५९ |
| १८ | ४४ | २०२ |
| १९ | ६८ | ३४९ |
| २० | ५१ | २०९ |
| २१ | २७ | २५३ |
| एकूण | ९०७ | ३६६९ |

जागोजागी जे का । दोन पदांमध्ये । आंकडे आहेत । टाकलेले ।।
नवीन प्रसंग । जेव्हां सुरू होतो । त्याचा तो क्रमांक । समजावा ।।
कांही प्रसंगांचे । अ आ इ ई ऐसे । आहेत अधिक । परिच्छेद ।।
ऐशा गिनतीने । वाटते प्रसंग । त्र्याण्णव आहेत । पोथीमधे ।।
पोथीचा कांहीसा । अभ्यास करतां । सहज आपुलें । आकलन ।।

## || ॐ श्रीगणेशाय नमः ||
## || श्रीशेगांवस्थिताय श्रीगजाननमहाराजाय नमः ||

मंगलाचरण तथा प्रस्तावना

नमन गणेशा । नमो गजानना । अवतार नाना । भक्तांसाठी ॥१॥
श्रीक्षेत्र शेगांवी । अज्ञेय प्रकट । जनें संबोधीलें । गजानन ॥२॥
दासगणूजीनी । विजय ग्रंथात । चरित्रमहात्म्य । रचियेले ॥३॥
कितीक भाविक । पोथी-पारायण । आपुल्या नेमाने । करतात ॥४॥
नऊशे पदांत । इथे सामावले । सारे एकवीस । अध्याय की ॥५॥
ऐशा रचियेल्या । सारांशाने होते । वाचन सत्तर । मिनिटांत ॥६॥
अभंगवृत्तात । सद्गुरुकृपेने । रचिले श्रीपाद । अभ्यंकरे ॥७॥
अभंग वृत्त हें । सरळ रसाळ । भक्तिभावाचीही । हीच रीत ॥८॥
भाविकांनी घ्यावा । आनंद भक्तीचा । मंगल लाभावे । सकळांना ॥९॥
==========

अध्याय १

नमो गजानना । आपल्या कृपेने । आरंभ पहिल्या । अध्यायास ॥१॥

**(१)**

शके अठराशे । माघमासी तिथी । वद्यसप्तमीची । होती पहा ॥२॥
शेगांवी मठांत । भोजने घालती । देवीदासराव । पातुर्कर ॥३॥
उष्ट्या पत्रावळी । दारी पडलेल्या । चाटूनी पुसतो । अवलिया ॥४॥
पाहती तें चित्र । बंकटलाल नि । मित्र दामोदर । कुळकर्णी ॥५॥
प्रेरणा जाहली । बंकटलालास । हा तरी महात्मा । आहे कुणी ।।६।।
तजवीज केली । बंकटलालाने । सुग्रास भोजन । खाववीले ॥७॥
अज्ञाताजवळी । होता कमंडलू । अग्रवाल करी । विनवणी ॥८॥
पाणी मी आणीतो । जरा धीर व्हावा । उत्तरले काय । महाराज ॥९॥
भुवनी भरले । परब्रम्ह तरी । भेद न कांहीच । मजलागी ॥१०॥
अन्न पोटी गेले । पाणी तेंही प्यावे । ऐसी रीत जनी । आहे खरी ॥११॥
तुम्हासही जरी । येणे वाटे तुष्टी । आणावे उदक । बोललेले ॥१२॥
परत येईतो । आडाचे ओहोळी । गढूळच पाणी । कां हो प्याले ॥१३॥

ब्रम्हाने व्यापीली । सारीच भुवने । गढूळ निर्मळ । भेद कैसा ॥१४॥
पाणी तरी ब्रम्ह । मलीनता ब्रम्ह । पिणाराही ब्रम्ह । ब्रम्ह सारे ॥१५॥
ईश्वराची लीला । आहे अनिर्वाच्य । श्रुतीही म्हणती । नेति नेति ॥१६॥
सत्य टाकूनीया । व्यवहार मात्र । भरला तुमचे । मनात ना ॥१७॥
जरा कांही आणा । मनात विचार । प्रारंभ जगाचा । कोठून गा ॥१८॥
पाया पडावया । दोघेही वांकले । परि क्षणी होते । दूर गेले ॥१९॥
नमो गजानना । अध्याय पहिला । मनी दृढ होवो । प्रार्थना गा ॥२०॥

=========

अध्याय २

नमो गजानना । आपल्या कृपेने । आरंभ दुसऱ्या । अध्यायास ॥१॥

(२)

कोठे आढळेना । विरह यातना । उत्कंठा दर्शना । बंकटाला ॥२॥
शेजारी रामजी । पंत देशमुख । त्यांना सांगीतली । मनःस्थिती ॥३॥
पूर्व सुकृताने । दर्शन जाहले । पुन्हाही घडेल । धीर धरी ॥४॥

(३)

मंदीरी कीर्तन । गोविन्दबुवांचे । टाकळीकरांचे । रंगलेले ॥५॥
बंकटाचा मित्र । पीतांबर शिंपी । सवें आला होता । कीर्तनाला ॥६॥
देवळाचे मागे । पाराकडे गेली । अचानक दृष्टी । बंकटाची ॥७॥
पाही तो बैसले । महाराज तेथे । गेला लगोलग । त्यांचेकडे ॥८॥
स्वामी कांही खाण्या । आणावें कां आजि । तुजला वाटते । तरी आण ॥९॥
माळीणीकडून । भाकर पिठले । आणूनीया दिले । आनंदाने ॥१०॥
पीतांबर गेला । तुंबा घेऊनीया । पाणी आणावया । ओहोळासी ॥११॥
तुंब्यामध्ये पाणी । भरते निर्मळ । जरी ओहोळाचे । गढूळचि ॥१२॥
बंकटलालासी । स्वामीनी म्हटले । भाकरीचे श्रेय । माळीणीचे ॥१३॥
तुझी दे सुपारी । स्वामीनी म्हणता । नाणेही बंकट । देऊं गेला ॥१४॥
नाणे व्यवहारी । मज नको कांही । तुझ्या भक्तीलागी । भेटलो मी ॥१५॥
भाव तव मनी । म्हणूनी भेटलो । लगबगे जावे । कीर्तनास ॥१६॥

(४)

भागवतातील । हंसगीताख्यान । पहिला चरण । बुवांमुखें ॥१७॥
दुसरा चरण । कोणी बा म्हटला । बुवाना जाहले । आश्चर्यचि ॥१८॥
बुवा सांगताती । ऐशा अधिकारी । व्यक्तीस मंडपी । बोलवा हो ॥१९॥
स्वामी परि नाही । जागचे हालत । बुवाही लागले । चरणासी ॥२०॥

सर्वव्यापी जरी । ईश्वर म्हणता । आंत कीं बाहेर । बिघडे कां ॥२१॥
वाणी नि करणी । ठेवा एकसार । पोटार्थी कीर्तन ॥ करू नये ॥२२॥
कोठे मी बैसलो । नको विवंचना । आपुली ठेवावी । समदृष्टी ॥२३॥
बुवानी श्रोत्याना । जागवीले तेव्हां । शेगावी हें रत्न । अनमोल ॥२४॥

(५)

बंकटलालाने । घरासी जाऊन । पित्यासी आग्रह । धरीयेला ॥२५॥
भवानीरामही । करीती संमती । व्यर्थ परि गेले । चार दिन ॥२६॥
सूर्यास्ताचे वेळी । भाग्य उजळले । चौकात पावले । महाराज ॥२७॥
घरी नेऊनीया । सेवा नि भक्तीचा । योग घडवीला । सर्वांनाच ॥२८॥
दुसरे दिवशी । होता सोमवार । सोहळाच झाला । शिवस्नाना ॥२९॥

(६)

काकांच्या मुलाच्या । मनी तेव्हां आले । प्रदोषभोजना । आमंत्रिले ॥३०॥
दुपारीच अन्न ।  खूप झाले तरी । इच्छाराम वाढी । आग्रहाने ॥३१॥
स्वामींचे स्वगत । गणप्या खादाड । समोरील अन्न । टाकूं नये ॥३२॥
परि जेव्हा झाला । खूपच आग्रह । वमन जाहले । भडभडा ॥३३॥
धर्माचाही पहा । नको अतिरेक । प्रादुर्भाव होतो । अधर्माचा ॥३४॥
लोकांसी जाहला । तेणे पश्चात्ताप । जागा साफ केली । पुनःपुन्हा ॥३५॥
स्वामीना आसनी । बसवूनी मग । सोहळा जाहला । दर्शनाचा ॥३६॥

(७)

दिंड्या दोन आल्या । भजन करीत । गजरही चाले । विठ्ठलाचा ॥३७॥
महाराजांची तो । वेगळीच धुन । गण गण् गणात । बोते ऐसी ॥३८॥
लोकाना वाटले । ॐ गं गणपतये । मंत्र तो प्रसिद्ध । म्हणतात ॥३९॥
तेव्हापासूनीया । गजानन नाम । लोकानी ठेवीले । स्वामीजींचे ॥४०॥
निरिच्छ आणीक । मुक्त साधू जरि । बंकटाचा स्वामी । भक्ताधीन ॥४१॥
नमो गजानना । अध्याय दुसरा । मनी दृढ व्हावा । प्रार्थना गा ॥४२॥

=========

## अध्याय ३

नमो गजानना । आपल्या कृपेने । आरंभ तिसऱ्या । अध्यायास ॥१॥

(८)

आर्त लोक येती । दर्शनास रोज । एके दिनी आला । परदेशी ॥२॥
मृगाजिनधारी । कासेस लंगोटी । डोक्यास फडके । ऐसा कोणी ॥३॥
जवळील लोकां । स्वामीनी म्हटलें । काशीहूनी आला । कोण पहा ॥४॥

झोळीमध्ये बुवा । लपवीतो बुट्टी । काढ ती बाहेरी । झडकरी ॥५॥
गोसाव्याने दिली । चिलीम भरून । त्यागावी म्हणून । प्रिय वस्तू ॥६॥
गोसाव्याचे झाले । नवस फेडणे । गांजाची पडली । प्रथा परि ॥७॥
अंजनीमातेच्या । इच्छेपोटी शंभू । वानररूपे ना । वावरला ॥८॥
विरागी योग्यास । व्यसन कां होते । ममत्वे ना लिंपे । एक वस्तू ॥९॥
कधी वेदोच्चार । कधी मौनव्रत । "गण गण् गणात । बोते" मग्न ॥१०॥
कधी पिशापरी । संचरण कधी । जागीच मुकाट । बसलेले ॥११॥

**(९)**

नामे जानराव । देशमुख होते । व्याधिग्रस्त तेणे । त्रस्त अति ॥१२॥
वैद्यांचे आणीक । हकीमांचे सारे । उपाय जाहले । अगतिक ॥१३॥
आप्तासी वैद्यानी । म्हटले वाटते । कांबळ्यावरती । घेण्या वेळ ॥१४॥
कोणी इतुक्यात । केलीसे सूचना । स्वामींचे चरण । धरावे ना ॥१५॥
शरण जाण्याने । संकट टळेल । देशमुखप्राण । वांचतील ॥१६॥
एक आप्त आले । भवानीरामांकडे । तीर्थालागी हेतू । निवेदिला ॥१७॥
आणलेल्या पात्री । पाण्यात पायाचे । अंगुष्ठ लावीले । तीर्थ होण्या ॥१८॥
स्वामीनीही दिली । संमती मानेने । नेऊनी प्राशीले । जानरावा ॥१९॥
थांबली घशाची । घर्घर लगेच । व्याधीस उतार । होत गेला ॥२०॥
एकाच सप्ताही । आरोग्य जाहले । सर्वश्रुत झाला । चमत्कार ॥२१॥
कृतज्ञ होऊनी । जानरावे मग । भंडाऱ्याचा घाट । घातला की ॥२२॥

महाराजा तेव्हा । मनी काय आले । लोक-उपद्रव । वाढेल ना ॥२३॥

**(१०)**

जनसमुदायी । ढोंगी भक्त एक । स्वामींचा लाडका । म्हणवीता ॥२४॥
स्वामींसी प्रसाद । म्हणूनी मिठाई । मागे लोकांकडे । त्रास फार ॥२५॥
स्वामींच्या सेवेचा । मक्ता जणूं ह्याचा । मिरवे लोकांत । ऐशापरी ॥२६॥
जातीचा तो माळी । नांवाचा विठोबा । स्वामींशी सलगी । दावी लोकां ॥२७॥
एके दिनी काय । घडली हो गोष्ट । परगांवीचे जे । भक्त होते ॥२८॥
त्याना आतुरता । परतण्या होती । स्वामी परि तेव्हां । निद्रिस्त कीं ॥२९॥
विठोबासी लोक । करीती विनंति । दर्शनाची सोय । कांही काढा ॥३०॥
स्वामींचे खांद्यास । लावूनीया हात । उठवाया धार्ष्ट्य । केले त्याने ॥३१॥
दर्शन घेऊनी । जन जैसे गेले । विठोबावरती । कडाडले ॥३२॥
विसरलासी कां । आपुली पायरी । उपद्रव मज । करीसी तुं ॥३३॥

तुवां भलताच । व्यापार कां ऐसा । माझे दर्शनाचा । चालवीला ॥३४॥
काठीचे प्रहार । खाऊनी विठोबा । पळाला करीत । हायहाय ॥३५॥
दैवे लाभलेली । संतांची संगती । हीनशा स्वार्थाने । गमावली ॥३६॥
संत कनवाळू । उदार प्रेमळ । दुष्टास देतील । दंड परि ॥३७॥
संतांचे सन्निध । महंती करणें । सावधपणाचे । काम जाणा ॥३८॥
नमो गजानना । अध्याय तिसरा । मनी दृढ व्हावा । प्रार्थना गा ॥३९॥

=========

अध्याय ४

नमो गजानना । आपल्या कृपेने । आरंभ चवथ्या । अध्यायास ॥१॥

**(११)**

अक्षय्य तृतीया । दिवशी वऱ्हाडी । पितृश्रादध नेमे । करतात ॥२॥
सकाळी सकाळी । स्वामीनी म्हटले । मुलाना चिलीम । भरूनी द्या ॥३॥
मुलानी उत्साहे । भरली चिलीम । शिलगाया हवा । विस्तव ना ॥४॥
चूली पेटवाया । होता अवकाश । विस्तव कोठून । मिळेल गा ॥५॥
बंकटलालाने । सोनाराकडून । विस्तव आणण्या । धाडीयेले ॥६॥
मुहूर्ताचे दिनी । कोणीही मागता । विस्तव देणेचे । होणे नाही ॥७॥
मुले विनवीती । कोणतीही वस्तू । साधूसी नकारूं । नये जाण ॥८॥
जालंधरनाथांचा । देऊनी हवाला । पुनश्च नकारे । जानकीराम ॥९॥
म्हणे खरा साधू । निर्माण करीतो । कोणतीही वस्तू । योगबळे ॥१०॥
तुम्ही सारी पोरे । बंकटलालही । वेड्याचे नादात । गुंतले कीं ॥११॥
हिरमुसलेली । पोरे परतली । स्वामी हांक देती । बंकटाला ॥१२॥
नुसतीच काडी । धरी चिलीमीस । कोरडा झुरका । स्वामी घेती ॥१३॥
जणूं समर्थानी । अग्निदेवा आज्ञा । केली प्रकटण्या । झुरक्याने ॥१४॥
निर्ज्योत काडीने । पेटली चिलीम । टाळ्या वाजवीती । पोरे सारी ॥१५॥

**(१२)**

सोनाराचे घरी । पंगत बैसली । मानाचा पदार्थ । चिंचवण ॥१६॥
परि चिंचवणी । कीड पडलेली । पाहूनी पंगत । बिघडली ॥१७॥
जानकीरामाला । झाली उपरती । साधूच्या निंदेने । ऐसे झाले ॥१८॥
बंकटलालासी । केली विनवणी । साधूची मागण्या । माफी आलो ॥१९॥
बंकटलालाची । वेगळीच शंका । चिंचच पहावी । तपासून ॥२०॥
चिंच तरी होती । सारी साफ स्वच्छ । कीड काय टिके । शिजताना ॥२१॥
जानकीरामाने । स्वामींचे चरणी । क्षमा मागीतली । काकुळती ॥२२॥

स्वामीनी म्हटले । चिंचवण तुझे । पाही निरखून । चांगलेच ॥२३॥
वृत्त पसरले । साऱ्या गांवामाजी । महती दानाची । साध्या सुद्धा ॥२४॥
(१३)
चंदू मकीनास । दिला अनुभव । आणीक आगळा । ज्येष्ठ मासी ॥२५॥
लोकानी आणीले । आंबे जरी खूप । स्वामींचा आग्रह । चंदूलागी ॥२६॥
अजून शिल्लक । आहेत पहावे । तुझ्या घरी दोन । कानवले ॥२७॥
चंदूच्या पत्नीस । वाटले आश्चर्य । खापराच्या तळी । दोन बाकी ॥२८॥
कैसेनी जाहले । अन्नब्रम्हालागी । एक मासावरी । दुर्लक्ष गा ॥२९॥
(१४)
चिंचोली गांवीचा । म्हातारा माधव । कुळकर्णी आला । दीनवाणा ॥३०॥
तारुण्यात केला । उधळेपणा ना । आता न उरला । वाली कोणी ॥३१॥
उपाशी राहोनी । मुखे नाम घेई । स्वामी बोललेसे । परखड ॥३२॥
कर्म न भोगीता । हट्ट करूनी कां । ऐसा मोक्ष येतो । आपसुक ॥३३॥
स्वामीनी घेतले । जामदग्न्यरूप । बोबडी वळली । माधवाची ॥३४॥
स्वामीनी म्हटले । तुवां केली पापें । काळ कीं भक्षील । याचपरी ॥३५॥
सम्पूर्ण शरण । माधव विनवी । नका मज धाडूं । नरकाला ॥३६॥
उद्धार करावा । अनंत सामर्थ्य । आहे आपणाचे । कृपा करा ॥३७॥
खोदखोदूनीया । स्वामीनी पुसले । माग काय हवे । देईन गा ॥३८॥
माधव म्हणतो । आणखी जीवित । आता नको कांही । द्यावी मुक्ति ॥३९॥
पाहूनी तयाचे । मनीचा निर्धार । तथास्तु म्हटला । आशिर्वाद ॥४०॥
म्हणती तुज ना । आता पुनर्जन्म । वैकुंठगमन । करी आता ॥४१॥
(१५)
असेंच एकदा । स्वामीनी म्हटलें । वेदपठण तें । व्हावें वाटे ॥४२॥
शिष्यांची तो चिंता । योग्य घनपाठी । नसती ब्राम्हण । गावांत कीं ॥४३॥
स्वामीनी म्हटले । उद्या नारायण । पाठवील विप्र । सज्ज व्हावे ॥४४॥
दुसरे दिवशी । दोन प्रहरासी । आले खरोखरी । विप्र पहा ॥४५॥
स्वामींच्या इशारें । शास्त्रशुद्ध मंत्रे । वसंतपूजन । सजलें कीं ॥४६॥
लोकांनी दक्षिणा । होती आज्ञेपरी । शंभर रुपये । जमवीली ॥४७॥
अभ्यागत विप्र । जाहले संतुष्ट । आनंदीआनंद । सर्व लोकां ॥४८॥
नेम जाहलासे । वसंतपंचमी । साजरी करावी । वेदमंत्रें ॥४९॥

नमो गजानना । चतुर्थ अध्याय । मनी दृढ व्हावा । प्रार्थना गा ॥५०॥

=========

अध्याय ५

नमो गजानना । आपल्या कृपेने । आरंभ पाचव्या । अध्यायास ॥१॥

(१६)

जनसंपर्काने । उद्विग्न होऊन । निघूनीया जाती । रानीवनी ॥२॥
असेच एकदा । गेले पिंपळगांवी । ध्यान लावीयेले । शिवालयी ॥३॥
गुराखी पोराना । झालें कुतूहल । समोर बैसोनी । न्याहाळती ॥४॥
तर्क सुरू झाले । जिवंत कीं मृत । भूत कीं महात्मा । कैसी स्थिति ॥५॥
कोण्या भाबड्याने । हार चढवीला । रानटी फुलांचा । फुलें डोई ॥६॥
कांदाभाकरीचा । ठेऊनी नैवेद्य । भजन बेसूर । आळवीले ॥७॥
विदेही आत्म्याच्या । शरीरास नोहे । कांही संवेदना । कसलीही ॥८॥
सायंकाळ होतां । घरी गेल्यावर । वार्ता निवेदिली । थोरांलागी ॥९॥
भल्या पहाटेस । मंडळी पाहती । "जैसे थे"च होते । सारे कांही ॥१०॥
पालखी आणोनी । स्वामी बैसवीला । वाजतगाजत । गांवी आले ॥११॥
मारुती मंदीरी । सूर्यास्तापर्यन्त । किती काय केले । उपचार ॥१२॥
कुणास प्रेरणा । करू उपोषण । नेत्र उघडले । स्वेच्छेनेच ॥१३॥
स्वामींची जागृती । पाहूनी लोकांत । स्पर्धा उसळली । पूजनास ॥१४॥
बाजारहाटासी । शेगांवी जे गेले । कौतुक बोलले । येथील ते ॥१५॥
शेगांवाप्रमाणें । पिंपळगांवीही । लाधलासे भाग्यें । एक यती ॥१६॥

(१७)

बंकटलालासी । वृत्त तें कळतां । आला लगबग । सपत्निक ॥१७॥
नाना प्रकारानी । केली आळवणी । आत्महत्येचाही । धाक दिला ॥१८॥
पिंपळगांवीच्या । जना आश्वासन । बंकटलालाने । आणि दिले ॥१९॥
विरही न व्हावे । कधीही यावें की । आपुल्याच घरी । निःसंकोच ॥२०॥

(१८)

वाटेत थट्टेने । बंकटलालासी । स्वामी सांगताती । मर्म कांही ॥२१॥
तुवां निजगृही । लक्ष्मी जेर केली । पाहूनी वाटते । भय मज ॥२२॥
मीही बंदिवान । होईन वाटले । संधी साधूनीया । निसटलो ॥२३॥
बंकटलालही । हजरजबाबी । तत्पर उत्तर । बोललासे ॥२४॥
लक्ष्मीस ना तमा । कुलुपाची कांही । आपुलेच पायी । स्थिरावली ॥२५॥
गप्पागोष्टीसंगे । पोचले शेगांवी । मुक्काम जाहला । कांही दिस ॥२६॥

(१९)

निघाले पुनश्च । कोणा न कळत । आडगांवा जाण्या । वऱ्हाडात ॥२७॥
कडक उन्हाळा । भाजतो शरीर । घशास कोरड । घामेघूम ॥२८॥
अकोल्याशेजारी । शेतात भास्कर । नकार तो देई । पाण्यासही ॥२९॥
पाटलाने केली । निंदाही आणिक । तूं तो न दुबळा । भिक्षा कां रे ॥३०॥
दुर्लक्षूनी बोल । विहीर दिसता । पाय वळवीले । तेथे जाण्या ॥३१॥
भास्कराची हांक । विहीर ती शुष्क । पाणी नाही कोठे । कोसभर ॥३२॥
स्वामी उत्तरले । दशा ही तुमची । पाहूनी प्रार्थना । मनी येते ॥३३॥
कूप जलयुक्त । करण्या देवास । करून पाहीन । आळवणी ॥३४॥
स्वामींचे ते बोल । ऐकून पाटला । वाटले कौतुक । भिकाऱ्याचे ॥३५॥
ध्यान लावूनीया । स्वामीनी आरंभ । केला आळवणी । करण्यास ॥३६॥
दाखले मांडले । पुराणांतरीचे । गोवर्धन आणि । प्रल्हादाचे ॥३७॥
प्रसन्न होई गा । आपा नारायणा । पत्थरी पाझर । फुटो आता ॥३८॥
चालली प्रार्थना । तोंवर कूपात । जळ ऐसे आले । ओसंडले ॥३९॥
तेव्हां शांत होत । निःशब्द होवोन । स्वामीनी नयन । उघडले ॥४०॥
घेऊनी ओंजळी । तृषा शांत केली । भास्कर पाहतो । अचंभित ॥४१॥
चरण धरूनी । क्षमापन मागे । निंदा केली त्याची । लाज मनी ॥४२॥
जैसीही स्फुरली । उपरती स्तुति । बोलत राहीला । चरणासी ॥४३॥
नको हा संसार । म्हणतां स्वामीनी । म्हटले विचार । पुन्हा कर ॥४४॥
संसार त्यागूनी । राहणे ना सोपे । कुंपणापल्याड । रान मोही ॥४५॥
ओसाड प्रदेशी । कूप ओसंडला । वार्ता पसरली । वाऱ्यासंगे ॥४६॥
तृषा शमवीली । कितीक लोकांची । चमत्कारें कृपा । सर्व जनां ॥४७॥

नमो गजानना । पाचवा अध्याय । मनी दृढ व्हावा । प्रार्थना गा ॥४८॥

## अध्याय ६

नमो गजानना । आपल्या कृपेने । आरंभ सहाव्या । अध्यायास ॥१॥
(२०)
बंकटलालाच्या । मित्रानी एकदा । कणसे पार्टीचा । बेत केला ॥२॥
बंकटलालाचे । मळ्यावर सारी । तयारी जाहली । व्यवस्थित ॥३॥
भक्ताना वाटले । स्वामीही सांगाती । आल्यास अलभ्य । लाभ खरा ॥४॥
आगट्या पेटता । धूर जो उठला । भिडला कोठल्या । मोहोळाला ॥५॥
माशा घोंघावत । येतां पळापळ । कणसें टाकूनी । गेली सारी ॥६॥

स्वामी ते राहीले । झाडाचे खालीच । पाहती मजेने । पळापळ ॥७॥
बंकटलालाला । झाली हळहळ । फुकटचा त्रास । स्वामीना कीं ॥८॥
एकाएकी माशा । दिसेनाशा झाल्या । स्वामींच्या आज्ञेने । गेल्या काय ॥९॥
साऱ्या अंगावर । पाहूनीया गांधी । बंकट विषण्ण । अति झाला ॥१०॥
स्वामी ते आनंदी । म्हणती मी ब्रम्ह । माशा त्याही ब्रम्ह । दुःख कैसे ॥११॥
डंख बोचलेले । काढाया सोनारा । बोलूनी आणले । बंकटाने ॥१२॥
योगयुक्तीने कां । देह फुलवीला । नांग्या काढण्यास । सोपे झाले ॥१३॥
नंतर लोकांनी । कणसें भाजूनी । सहल आनंदें । आटोपली ॥१४॥

(२१)

असेच एकदा । स्वामी गेले वनी । अकोटाजवळी । मित्रभेटी ॥१५॥
नृसिंहस्वामींचे । भेटीने जाहला । वार्तालापें मोद । परस्परां ॥१६॥
कुणकुण काय । गांवात लागली । वनाकडे रीघ । पहाटेच ॥१७॥
परि स्वामी गेले । निघून तेथून । दर्यापुरापाशी । शिवर्गांवी ॥१८॥

(२२)

येई तेथे एक । चंद्रभागेतीरी । व्रजभूषणसा । सूर्यभक्त ॥१९॥
नित्यनेमे अर्घ्य । देण्यास येतसे । प्रभाती पंडित । नदीकांठी ॥२०॥
आजही येऊन । समोर पाहतां । वाळवंटी तेज । अलौकिक ॥२१॥
रविराज स्वतः । आपलेकरीता । आले ऐसे झाले । पंडिताना ॥२२॥
स्वामींचेच पायी । अर्घ्यजल दिले । नमस्कार बारा । वाहीयेले ॥२३॥
आशीष देऊनी । प्रेमाने तयास । सशिष्य शेगांवी । परतले ॥२४॥

(२३)

शिवगांवाचेच । शेगांव हें नांव । शिवाचे स्वरूप । हनुमंत ॥२५॥
मारुती मंदीरी । श्रावणमासात । उत्सवाची रीत । दरवर्षी ॥२६॥
बंकटलालासी । स्वामीनी म्हटलें । मंदीरी राहीन । इतःपर ॥२७॥
यतीस ना योग्य । घरांत राहणें । मंदीर तें योग्य । भ्रमण वा ॥२८॥
प्रसंगविशेषी । बोलावशील तूं । येईन ती चिंता । नको धरूं ॥२९॥

(२४)

भास्कर पाटील । मारुती मंदीरी । येऊन राहीला । सेवेकरी ॥३०॥

नमो गजानना । सहावा अध्याय । मनी दृढ व्हावा । प्रार्थना गा ॥३१॥

=========

अध्याय ७

नमो गजानना । आपल्या कृपेने । आरंभ सातव्या । अध्यायास ॥१॥

(२५)

पाटलाची पोरे । उद्दाम उर्मट । मुक्काम हलवा । धाक देती ॥२॥
भास्कर पाटील । जाहले अस्वस्थ । स्वामीनीच त्यांना । समजावीले ॥३॥
पोरकटपणा । केवळ पोरांचा । थोरांचे कर्तव्य । क्षमापन ॥४॥

(२५ अ)

पोरांचा म्होरक्या । हरी पाटील तो । म्हणे चल ऊठ । करूं कुस्ती ॥५॥
स्वामीही लगेच । करूनीया मान्य । गेले तयासंगे । तालमीस ॥६॥
हौद्याचे जवळी । बैठक मारूनी । हरीस म्हटले । उठव की ॥७॥
हालता हालेना । देह तसूभर । हरी तो जाहला । घामाघूम ॥८॥
जडत्व सिद्धीचा । प्रत्यय पाहून । स्वामींची महत्ता । उमगला ॥९॥
शरणागत त्या । हरी पाटलाला । स्वामीनी दिधला । उपदेश ॥१०॥
तरुण जमवा । वाढवा तयांची । शरीरसंपदा । योग्यकामी ॥११॥
बळ मेळवोनी । गांवाचे रक्षण । करीतां समाज । मानेल कीं ॥१२॥

(२६)

हरीस पटला । लोकां सांगूं गेला । तरी लोक ढोंग । म्हणताती ॥१३॥
आपुल्या प्रकारें । आम्ही ठाव घेऊं । मनी ठरवीती । दुष्ट बेत ॥१४॥
इक्षुदंड हाती । घेऊनी पातले । स्वामीना घेरूनी । बोललेनी ॥१५॥
कसोटी कराया । ऊसानी मारतां । पाहूं वळ कैसे । उठतील ॥१६॥
फुकाचे ना बोल । खरोखरी मार । देण्या सुरवात । त्यानी केली ॥१७॥
आधी होता जोर । सपासप मार । जणूं तालबद्ध । खूप झाला ॥१८॥
ऊंसही तुटले । हातही थकले । वळ ना उठला । एक अंगी ॥१९॥
उलटे स्वामीनी । पोराना म्हटलें । श्रम खूप झाले । रस पिऊं ॥२०॥
केवळ हातानी । ऊंस पिळूनीया । खरोखरी रस । पाजीयेला ॥२१॥
खजील पोरानी । पाया पडूनीया । क्षमा मागीतली । कळवळे ॥२२॥

(२७)

खंडू पाटलाला । वृत्तांत कळला । तरीही तो बोले । गण्या गजा ॥२३॥
म्हातारा कुकाजी । खंडूस सुचवी । मूलबाळ माग । साधूकडे ॥२४॥
स्वामींचे चरणी । लवून खंडोबा । संततीची कृपा । करा मज ॥२५॥
स्वामीनी म्हटले । देवाघरी उणे । नाही एक शर्त । मात्र आहे ॥२६॥
मुलाचे त्या नांव । ठेवावे भिकाजी । आम्रसभोजन । द्यावे द्विजा ॥२७॥
एकाच वर्षाने । पुत्रलाभ झाला । अन्नदान केले । जैसी आज्ञा ॥२८॥

संतति संपत्ती । पाटला पावली । पाहून मत्सर । देशमुखा ॥२९॥

नमो गजानना । सातवा अध्याय । मनी दृढ व्हावा । प्रार्थना गा ॥३०॥

==========

## अध्याय ८

नमो गजानना । आपल्या कृपेने । आरंभ आठव्या । अध्यायास ॥१॥

**(२८)**

खंडू हांक देई । मऱ्या महारास । टप्पा भरायला । पाठवाया ॥२॥
तुमचे मी काम । नाही करणार । देशमुखांचाच । सेवक मी ॥३॥
फालतु सेवक । काम नाकारतो । भाषाही तयाची । कायद्याची ॥४॥
देशमुखपद । पाटला वरिष्ठ । ऐसाही प्रवाद । बोलतो कीं ॥५॥
समज हे सारे । उद्धटपणाही । वाटे फूस देतो । देशमुख ॥६॥
उद्दाम उत्तर । मऱ्याचे ऐकून । संताप चढला । पाटलाला ॥७॥
रागाचे भरात । काठीचा प्रहार । पाटलानी केला । मऱ्यावर ॥८॥
वर्मी कां लागले । बेशुद्ध होऊन । जागीच आडवा । मऱ्या झाला ॥९॥
बातमी पोचली । देशमुखा कानी । तत्काळ मऱ्यास । नेले त्यानी ॥१०॥
सरकार दर्बारी । तक्रार नोंदेन । धाकही बोलले । जातां जातां ॥११॥
तेणे हातपाय । खंडूचे गळाले । आगळीक तरी । झाली होती ॥१२॥
बंधू अकोल्यास । श्रेष्ठ हुद्यावर । वशिल्याने अब्रू । वांचेल कां ॥१३॥
महाराजांकडे । सांकडे घालाया । खंडू आला केला । दंडवत ॥१४॥
स्वामीनी तयास । अभयवचन । दिलें तें सांत्वन । सत्य झालें ॥१५॥
खंडूने स्वामीना । नेऊनी स्वगृही । सेवाभक्ती खूप । रुजूं केली ॥१६॥

**(२९)**

तिथे असताना । तेलंगणाहून । भिक्षार्थी ब्राम्हण । कोणी आले ॥१७॥
निद्रिस्त स्वामीना । उठावया वेद । मंत्र पदक्रम । म्हणूं गेले ॥१८॥
स्वरप्रमाद कीं । खटकतां स्वामी । उठले ब्राम्हणां । हटकले ॥१९॥
तीच सूक्ते पुन्हा । स्वामीनी बिनचूक । म्हणून दावीली । ब्राम्हणाना ॥२०॥
स्वामीनी पुसीले । वेदमंत्र काय । तुम्ही पोटासाठी । अभ्यासीले ॥२१॥
वेदविद्या ती तो । मोक्षासाठी खरी । फसवूं नका हो । भाविकांना ॥२२॥
क्षमायाचना ते । करीती ब्राम्हण । रुपया दक्षिणा । देववीली ॥२३॥

**(३०)**

स्वामी कंटाळले । गांवात रहाण्या । मळ्यामध्ये गेले । कृष्णाजीच्या ॥२४॥

ब्रम्हगिरी आणि । शिष्य कांही त्यांचे । आले अभ्यागत । अचानक ॥२५॥
कृष्णाजी पाटलां । म्हणती गोसावी । तीन दिन आम्ही । राहूं येथे ॥२६॥
गांजाची आणीक । शिरापुरीचीही । व्यवस्था असावी । सांगीतलें ॥२७॥
तुम्ही तरी एक । भ्रमिष्ट पोसला । वेदांत जाणतो । आम्ही पहा ॥२८॥
कृष्णाजी पाटील । बोलला विनये । उद्याचे भोजनी । शिरापुरी ॥२९॥
आत्ता तरी शक्य । भाकऱ्या केवळ । भूक भागवावी । आज त्यानी ॥३०॥
भोजनानंतर । श्रीब्रम्हगिरींचे । प्रवचन व्हावें । नेम तोही ॥३१॥
शिष्य ते होतेच । ग्रामस्थही आले । "नैनं छिन्दन्ति" हा । निरूपणा ॥३२॥
कोणी कुजबूज । करीत म्हणाले । गीता जगतोसा । योगी इथे ॥३३॥
गांजा ओढणाऱ्या । शिष्यानी ऐकली । कुजबूज तेव्हां । रागावले ॥३४॥
स्वामी ते बाजूला । पलंगावरीच । चिलीम ओढीत । बसलेले ॥३५॥
अचानक तेव्हां । ठिणगी पडून । पलंग पेटला । चहूंबाजू ॥३६॥
भास्कर पाटील । स्वामीना विनवी । पलंग सोडून । उठावया ॥३७॥
स्वामीनी म्हटले । जरा धीर धरी । आत्म्यासी पावक । जाळेचिना ॥३८॥
ब्रम्हगिरीनाही । पलंगावरती । येण्यासी आग्रह । धरीयेला ॥३९॥
"नैनं छिन्दन्ति" ह्या । उक्तीचा प्रत्यय । देण्यास आहे ना । नामी संधी ॥४०॥
भास्कर पाटील । आणि ब्रम्हगिरी । यांच्यात लागली । खेंचाखेंच ॥४१॥
ब्रम्हगिरी करी । गयावया आणि । स्वामींचे पायासी । क्षमा मागे ॥४२॥
लोकही करती । स्वामीना आग्रह । पलंग सोडोनी । यावें आतां ॥४३॥
स्वामी उतरले । लोकानी तत्काळ । पलंगाची आग । विझवीली ॥४४॥
ब्रम्हगिरीलागी । केला उपदेश । आत्मज्ञान नोहे । पोटासाठी ॥४५॥
अनुभवाचे जे । तेवढे बोलावे । पांडित्याचा दंभ । कशापायी ॥४६॥
ब्रम्हगिरीना तैं । जाहली विरक्ती । रातोरात गेले । एकटेच ॥४७॥

नमो गजानना । आठवा अध्याय । मनी दृढ व्हावा । प्रार्थना गा ॥४८॥

=========

अध्याय ९

नमो गजानना । आपल्या कृपेने । आरंभ नवव्या । अध्यायास ॥१॥

**(३१)**

स्वामी राहती तें । शिवाचे मंदीर । सुबक जाहलें । जीर्णोद्धारें ॥२॥
मोटे सावकार । यांनी पैका दिला । मोटे मंदीरसे । नांव झाले ॥३॥

**(३२)**

एके दिनी तेथे । आले हरिदास । टाकळि गांवीचे । गोविंदबुवा ॥४॥
त्यांचा घोडा होता । भारी अवखळ । रात्रीचा दाव्याशी । बांधलेला ॥५॥
दावे तोडूनीया । जाईल कीं घोडा । बुवांचे मनास । भारी चिंता ॥६॥
अधूनमधून । उठून पाहती । आज तरी घोडा । निवांतसा ॥७॥
आश्चर्य वाटले । निरखण्या गेले । घोड्याचे पायाशी । होते कांही ॥८॥
कंदील घेऊनी । पाहती तों स्वामी । घोड्याचे पायांत । झोपलेले ॥९॥
स्वामी ते निद्रिस्त । तरी "गण् गणात । बोते" ऐसा शब्द । गुंजे कानी ॥१०॥
माजोरी तो अश्व । नरम जाहला । स्वामींचे चरणी । बुवा नत ॥११॥

**(३३)**

बाळापुराहूनी । आले दोन भक्त । मनांत स्वामीना । गांजा द्यावा ॥१२॥
परि दोन वेळां । विस्मरण झाले । तैसेच जाहले । तिस-यांदा ॥१३॥
स्वामीनी जाणून । मनोगत त्यांचे । म्हटले गांवात । जाऊं नका ॥१४॥
पुढील खेपेस । विसर न व्हावा । विचारी आचारी । मेळ हवा ॥१५॥
दर्शना आणीक । पांच वेळां यावें । सफल होईल । मनोगत ॥१६॥
स्वामींचा आदेश । पाळतां फळला । आशीष दोघाना । सुखी झाले ॥१७॥

**(३४)**

त्याच बाळापुरी । रामदासी करी । सज्जनगडाची । वारी नेमें ॥१८॥
पुतळा भार्याही । संगे वारी करी । माघ वद्य तिथी । प्रतिपदा ॥१९॥
वय झाले साठ । अशक्ततेमुळे । समाधीशी केली विनवणी ॥२०॥
येथून पुढती । वारी न झेपेल । समाधीदर्शना । मुकूं आम्ही ॥२१॥
क्षमा मागूनीया । झाले निद्राधीन । स्वप्नांत सांत्वन । समर्थांचे ॥२२॥
चिंता नको कांहीं । गांवीच करावा । उत्सव वार्षिक । तेंही ठीक ॥२३॥
पुढील वर्षीच । माघनवमीस । देईन दर्शन । आश्वासीलें ॥२४॥
दृष्टांतानुसार । माघवद्यपक्षी । उत्सवाचा थाट । बाळापुरी ॥२५॥
ग्रंथपारायण । दिवसा चालावें । कीर्तन रंगावें । सायंकाळी ॥२६॥
रोज दोप्रहरी । ब्राम्हणभोजन । आनंदीआनंद । कार्यक्रमी ॥२७॥
नवमीचे दिनी । दोन प्रहरासी । स्वामी तेथे आले । अचानक ॥२८॥
संतांचे चरण । पावले पाहून । आनंद मावेना । गगनांत ॥२९॥
उत्स्फूर्त उद्घोष । स्वामीनी मांडला । जय जय रघुवीर । समर्थसा ॥३०॥
त्याच रात्री स्वप्नी । समर्थ म्हणती । गजानन जाण । मीच आलों ॥३१॥
ऐसी जाणूनीया । संता एकात्मता । स्वामीना आग्रह । खूप केला ॥३२॥
इथेच रहावे । बाळापुरी आतां । स्वामी आश्वासती । तेव्हां त्यास ॥३३॥

येईन मी पुन्हा । कालांतरें जाण । आम्ही ना राहतों । एके जागीं ॥३४॥

नमो गजानना । नववा अध्याय । मनी दृढ व्हावा । प्रार्थना गा ॥५०॥

==========

अध्याय १०

नमो गजानना । आपल्या कृपेने । आरंभ दहाव्या । अध्यायास ॥१॥

**(३५)**

एकदा स्वामींची । अमरावतीस । भिकाजीचे घरी । आली स्वारी ॥२॥
नांव आत्माराम । नांवाप्रमाणेच । संतसेवाधर्म । पाळीतसे ॥३॥
कितीक ते भक्त । येती भेटावया । गैरसोय मुळी । नाही कोणा ॥४॥
कितीकांना वाटे । आपणाकडेही । चरणसेवेचा । योग व्हावा ॥५॥

**(३६)**

खापर्डे वकील । महान व्यक्तित्व । परि झाले लीन । घरी नेले ॥६॥

**(३७)**

गणेश अप्पासा । लिंगायत वाणी । आणि त्याची भार्या । चंद्राबाई ॥७॥
यांचेही मनात । आर्तता दाटली । स्वामीना आपुल्या । घरी न्यावे ॥८॥
वाण्याचे मनात । भीड तरी होती । गरीबाचे घरी । येतील कां ॥९॥
चंद्राबाई म्हणे । पहावे बोलून । असल्यास योग । येतील कीं ॥१०॥
भेटीस दोघेही । मिळूनच आली । शब्द अडकला । गळ्यामध्ये ॥११॥
स्वामीनीच हात । गणूचा धरीला । किती दूर घर । पुसीयेले ॥१२॥
यावेसे वाटते । ऐसेही म्हटले । हर्षभरें गणू । आनंदित ॥१३॥

**(३८)**

भिकाजीचा भाचा । बाळाभाऊ नांव । मुंबैहून आला । भक्त झाला ॥१४॥
संसाराचा त्याला । वीट मनी आला । स्वामींचे सन्निध । राही सदा ॥१५॥

**(३९)**

अमरावती तैं । सोडूनीया स्वामी । परतले पुन्हा । शेगांवास ॥१६॥
माटे मंदिराच्या । निकट ओसाड । जागा होती तेथे । बसायाचे ॥१७॥
मळ्यांत कां नाही । आतां येत स्वामी । कृष्णाजी पाटला । खंत वाटे ॥१८॥
परंतु स्वामीनी । बंकटाकरवी । समज सर्वांना । कांही दिला ॥१९॥
स्वामींचा मानस । जाणूनी सर्वांनी । मठ एक तिथे । बांधीयेला ॥२०॥

**(४०)**

स्वामींच्या सेवेला । बाळाभाऊ नित्य । लोकांत उठला । सल त्याचा ॥२१॥

मिठाई मिळते । फुकट खायाला । म्हणूनी कां सेवा । पत्करली ॥२२॥
स्वामीनीही त्यास । धाडीले मुंबैस । नोकरीवरती । रुजूं होण्या ॥२३॥
बाळाभाऊ परी । देऊनी इस्तिफा । परतुनी आला । शेगांवास ॥२४॥
लोकांनी स्वामीना । सुचवीलें तेव्हां । ठिकाणा येईल । मार खाता ॥२५॥
स्वामीनीही तेव्हां । बाळास काठीने । झोडतां काठीही । मोडली कीं ॥२६॥
स्वामी बोलावूनी । लोकाना म्हणती । पहा खूण कोठे । माराची कां ॥२७॥
लोक पाहताती । जवळ येऊन । बाळाभाऊ दंग । आनंदात ॥२८॥
एकांतिक भक्ति । पाहूनीया त्याची । वरमले सारे । लोक तेव्हां ॥२९॥

**(४१)**

बाळापूर गांवी । सुखलाल सेठ । त्याची गाय द्वाड । मारकुटी ॥३०॥
सुखलाला कानी । गोष्ट समजली । टाकळिकरांच्या । घोड्याची ती ॥३१॥
बैलगाडीसंगें । गाय ती आणली । गरीब जाहली । स्वामींपुढे ॥३२॥

**(४२)**

कारंजा गांवात । लक्ष्मणजी कुडे । उदर व्याधीने । त्रस्त अति ॥३३॥
त्याला उचलोनी । लोकांनी आणीला । स्वामींचे दर्शना । संगे पत्नी ॥३४॥
कुंकवाची भीक । मागण्यासी तिने । पायासी पदर । पसरला ॥३५॥
स्वामी खात होते । एक आंबा तेव्हां । तोच पदरात । टाकीयेला ॥३६॥
हाच आंबा देई । खाण्यास पतीला । औषध दुसरे । नको कांही ॥३७॥
वैद्य जरी देई । कुपथ्याचा धाक । आदेश पाळीला । निःसंकोच ॥३८॥
रेचक जाहले । पतीस अनेक । पोट ठीक झाले । व्याधी गेली ॥३९॥
कृतज्ञ वाटून । स्वामींचे दर्शना । लक्ष्मण पातला । शेगांवास ॥४०॥
आग्रह करूनी । आणीले स्वामीना । आदराने घरीं । कारंजास ॥४१॥
दक्षिणा देताना । वरवरी म्हणे । सर्वस्व आपुले । मी कां दाता ॥४२॥
ऐसे म्हणताना । ताटात दक्षिणा । मोजकी ठेवीली । रुपयांची ॥४३॥
त्याची ऐसी कृती । पाहून स्वामीनी । म्हटले दक्षिणा । विसंगत ॥४४॥
तूंच ना म्हटले । सर्वस्व आपुलें । तरी घर खाली । करी आता ॥४५॥
घरातील सर्व । सामान बाहेर । टाकूनी मोकळा । होई आता ॥४६॥
कोठाराच्या चाव्या । देई मजकडे । दिङ्मूढ लक्ष्मण । गप्प उभा ॥४७॥
स्वामीनी म्हटले । इतुके असत्य । भरलेल्या जागी । जेवेन ना ॥४८॥
मायेचा हा गुंता । बोलण्यात खोट । याचे पहा फळ । भोगशील ॥४९॥
रागाने निघून । गेले मग स्वामी । शापच ठरला । त्यांचा शब्द ॥५०॥
लक्ष्मणाची पुढे । झाली वाताहत । कायावाचामने । एक हवे ॥५१॥

नमो गजानना । दहावा अध्याय । मनी दृढ व्हावा । प्रार्थना गा ॥५२॥

=========

## अध्याय ११

नमो गजानना । आपल्या कृपेने । आरंभ अकराव्या । अध्यायास ॥१॥

**(४३)**

पुढील वर्षीचे । रामनवमीस । बाळापूर गांवी । स्वामी गेले ॥२॥
बाळकृष्णाकडे । उत्सवाचे दिनी । भास्करास कुत्रा । चावला कीं ॥३॥
औषधे घेण्यास । लोकांचा आग्रह । स्वामींचे चरण । औषध हो ॥४॥
स्वामीनी म्हटले । हत्या ॠण वैर । प्रायश्चित्त यांचे । टळेल ना ॥५॥
जन्मजन्मांतरी । येतसे समोर । श्वानास गाईचा । द्वाडपणा ॥६॥
दुधाचे स्वार्थाने । सुखलालाने ना । गाईस आणले । मजकडे ॥७॥
श्वानदंशाने ह्या । कर्माची समाप्ती । जाहलीसे आता । समजावे ॥८॥
तेव्हा द्वाडपणा । गाईचा शमला । परतूनी आला । श्वानाप्रति ॥९॥
भास्करा पुसीले । तुज काय हवे । आयुष्य की मोक्ष । ठरव तूं ॥१०॥
जरी मागशील । आणीक आयुष्य । पुढील जन्मीची । उधारी ती ॥११॥
मरणचि जरी । आत्ता मागशील । दोन मास तरी । जगशील ॥१२॥
विमुक्त होऊन । वैकुंठगमन । पावशील काय । तुज हवे ॥१३॥
माझे जे कां हित । आपणासी ठावे । पूर्ण भरंवसा । तुम्हा पायीं ॥१४॥
विषबाधा कांही । तुज न होईल । शेगावास आता । चल जाऊं ॥१५॥

**(४३ अ)**

शेगांवी लोकाना । भास्कर विनवी । अखेरची इच्छा । माझी जाणा ॥१६॥
तीर्थक्षेत्रे जैसी । पंढर्पूर देहू । आळंदी तैसेच । येथे होवो ॥१७॥
स्वामींचे स्मारक । बांधण्या वचन । लोकानी दिधले । भास्करास ॥१८॥

**(४३ आ)**

स्वामीनी म्हटले । आता जाया हवे । त्र्यंबकेश्वरास । भास्करा गा ॥१९॥
सारी तीर्थक्षेत्रे । आपुले चरणी । यात्रेचे तरी कां । प्रयोजन ॥२०॥
स्वामीनी म्हटले । स्थानाचे आपुले । महत्त्व असते । ध्यानी धरी ॥२१॥

**(४३ इ)**

यात्रा करूनीया । नाशकास आले । तिथे संतबंधू । गोपाळदास ॥२२॥
त्यांचेसंगे केला । अध्यात्मविचार । परस्परां खूप । समाधान ॥२३॥

**(४३ ई)**

शेगांवी परत । येतां श्यामसिंग । देई आमंत्रण । आडगांवा ॥२४॥
तेथे आनंदाने । हनुमंजयंती । साजरी होताना । काय केले ॥२५॥
स्वामीनी भास्करा । पाडूनी खालती । बैसले तयाचे । उरावरी ॥२६॥
अतीव ताडण । झाले तेव्हां त्याना । बाळाभाऊ म्हणे । सोडा आता ॥२७॥
स्वामींचा खुलासा । ऐशा ताडणाने । झाडा घालवीला । संचिताचा ॥२८॥
भास्कराकारणें । बाळाभाऊनेच । होता मार खाल्ला । स्वामीहस्तें ॥२९॥
तृतीया तिथीस । स्वामीनी म्हटले । आतां दोन दिस । तुझे बाकी ॥३०॥
पंचमीचे दिनी । भास्करास केली । सूचना घालाया । पद्मासन ॥३१॥
हरीचे चरणी । चित्त स्थिर होतां । स्वामी गरजले । हरहर ॥३२॥
तेव्हांच सहजी । उडाला कीं प्राण । गुरुकृपा थोर । ऐसी केली ॥३३॥
अर्ध्या कोसावर । द्वारकेश्वराचे । मंदिराजवळी । वृक्षवल्ली ॥३४॥
तेथेच समाधी । बांधवूनी मग । अन्नदान झाले । दहा दिन ॥३५॥

**(४४)**

कावळ्यांचा खूप । उपद्रव होतां । लोक मारूं गेले । कावळ्याना ॥३६॥
स्वामी आश्वासती । नका मारूं ह्याना । उद्या न येईल । काक एक ॥३७॥
मानवाची वाणी । पक्षी कां जाणेल । खातर कराया । जन आले ॥३८॥
एकही कावळा । नजर ना येई । सामर्थ्य स्वामींचे । कळूं आले ॥३९॥

**(४५)**

शेगांवास स्वामी । परतले तेव्हां । दुष्काळाची कामें । चाललेली ॥४०॥
विहीर खोदण्या । सुरुंग लावीले । होते खोल खाली । एके जागी ॥४१॥
सरबत्ती देण्या । पुंगळ्या सोडल्या । विस्तव दारूस । लागेचना ॥४२॥
सुरुंगाजवळी । पाणी जमलेले । पुंगळी पाहिजे । हलवीली ॥४३॥
जोखमीचे काम । करण्या हुकूम । गणू जवऱ्यास । मेस्त्री करी ॥४४॥
दरिद्री आणीक । अगतिक गणू । खाली उतरला । कामासाठी ॥४५॥
सुरुंगाचे स्फोट । अचानक सुरू । झाले गणू खाली । अडकला ॥४६॥
गणू स्वामीभक्त । स्मरे त्यांचे नाम । सांपडले त्यास । खबदाड ॥४७॥
एकावरी एक । सुरुंग उडती । शिळा एक आली । उडोनीया ॥४८॥
तिने खबदाड । झाले कीं हो बंद । गणू पूर्णपणे । अडकला ॥४९॥
स्फोट थंड झाले । अस्वस्थ लोकाना । वाटले प्रेतच । दिसणार ॥५०॥
वाचवा वाचवा । गणूचा आवाज । ऐकूनी सावध । मेस्त्री झाला ॥५१॥
शिळा हटवूनी । बाहेर निघतां । गणू धाव घेई । स्वामीपदीं ॥५२॥
त्याचे पाठीवरी । ठेऊनीया हात । स्वामीच म्हणती । वाचलास ॥५३॥

शिळेने झांकले । बरें खबदाड । एरव्ही तूं तरी । उतावीळ ॥५४॥
हें काय म्हणावें । अपरोक्ष ज्ञान । कां स्वतःच स्वतःस । वांचवीलें ॥५५॥

नमो गजानना । अकरावा अध्याय । मनी दृढ व्हावा । प्रार्थना गा ॥५६॥
=========
अध्याय १२
नमो गजानना । आपल्या कृपेने । आरंभ बाराव्या । अध्यायास ॥१॥
(४६)
अकोल्यात एक । भक्त बच्चूलाल । आडनांव त्याचे । अग्रवाल ॥२॥
स्वामींच्या भेटीची । मनी तळमळ । स्वामीच एकदा । अकोल्यात ॥३॥
अवचित आले । त्याचेच घरास । इच्छा व्यक्त करी । पूजा करूं ॥४॥
अनुमति होतां । षोडशोपचारे । पूजा सजवीली । स्वामींची कीं ॥५॥
सुग्रास भोजन । पीतांबर शाल । दागीने मोहरा । दशसहस्र ॥६॥
श्रीराम मंदीर । व्हावें ही प्रार्थना । स्वामीनी वरली । आशीर्वादें ॥७॥
स्वामीनी उठोनी । दागीने नि वस्त्रे । परतोनी दिली । बच्चूलाला ॥८॥
मजसी कांही न । यांचे प्रयोजन । उपाधी ह्या साऱ्या । विषासम ॥९॥
आपुलें वैभव । ठेवी स्वतःकडे । विठ्ठल तिष्ठतो । मजसाठी ॥१०॥
दोन पेढे फक्त । घेऊनी स्वच्छंदें । स्वामी परतले । शेगांवास ॥११॥
तरी कालांतरें । वैभव वाढतां । मंदीर बांधले । घरापुढे ॥१२॥
(४७)
शेगांवी मठांत । भक्त पीतांबर । गरीब वस्त्रेही । जीर्ण त्याची ॥१३॥
त्याच्या सेवेवरी । संतुष्ट होवोनी । स्वामीनी दुपट्टा । त्यास दिला ॥१४॥
इतरांचे मनी । पीतांबराविशी । दाटला मत्सर । अविवेकी ॥१५॥
गुरूचें जें वस्त्र । आपण नेसावें । गुरुचा करीतो । अपमान ॥१६॥
खुलासा तो करी । गुरूचे आज्ञेने । नेसतो ते कोणी । मानेचि ना ॥१७॥
वाद मिटविला । स्वामीनी तो सारा । संचार कराया । धाडीयेले ॥१८॥
विश्वास दिधला । माझा आशीर्वाद । सन्मार्गाने करी । लोकोद्धार ॥१९॥
(४७ अ)
कोंडोळीस आला । आम्रतरुतळी । सद्गुरुचिंतनी । रात्र गेली ॥२०॥
दुसरे दिवशी । गेला झाडावरी । परि तेथे मुंग्या । मुंगळे ही ॥२१॥
बसावया नाही । जागा फांदीवर । मुंग्यांच्या चाव्यानी । पछाडला ॥२२॥
नटराजापरी । नाचत राहीला । तोल परि मुळी । नाही गेला ॥२३॥

त्याचा तो प्रकार । पाहूनी गुराखी । बोलावीते झाले । गांव सारा ॥२४॥
लोकांनी पुसीले । आलासी कोठून । चढला कशास । झाडावर ॥२५॥
शेगांवीचा भक्त । स्वामींचा म्हटलें । त्यानी धाडियेले । संचारास ॥२६॥
मुंग्यांच्या चाव्यानी । परि मी त्रासलो । म्हणूनी चढलो । झाडावर ॥२७॥
लोक दटावती । फसवीसी काय । स्वामींचे सांगोनी । नांव आम्हां ॥२८॥
तेव्हां देशमुख । नांव श्यामराव । म्हणाले परीक्षा । घेऊं ह्याची ॥२९॥
वृक्ष वठलेला । आहे हा निष्पर्ण । करी डेरेदार । आळवोनी ॥३०॥
तुझी भक्ति जरि । असेल साजीरी । दाखवी पुरावा । एणे रीती ॥३१॥
एरव्ही खाशील । मार पहा खूप । पीतांबर करी । गयावया ॥३२॥
माझीया भक्तीची । कठीण परीक्षा । ऐसी नका घेऊं । विनवीतो ॥३३॥
मंडळी मानेना । तेव्हां पीतांबरें । धावा सुरू केला । गुरुलागी ॥३४॥
उत्स्फूर्त स्तवन । पीतांबर बोले । डोलाया लागले । सारे जण ॥३५॥
उदंड गजर । जैसा का रंगला । पालवी फुटली । वृक्षावरी ॥३६॥
पाने तोडूनीया । खातरही केली । जयजयकार केला । पीतांबरा ॥३७॥
नंतर लोकानी । कोंडोली गांवात । पीतांबर नांवें । मठ केला ॥३८॥

**(४८)**

पुढें काय झालें । शेगांवी एकदा । स्वामी उद्विग्नसे । बसलेले ॥३९॥
मठात रहाया । मन न लागते । लोक बिचकले । नवे काय ॥४०॥
शेगांव सोडूनी । जातील कां स्वामी । चिंता उपजली । सर्वां मनी ॥४१॥
स्वामीनी म्हटलें । सरकारी जागा । बक्षीस मिळाया । अर्ज करा ॥४२॥
लोकां मनी शंका । राजा तो परका । जागा देईल कां । सरकारी ॥४३॥
करी साहेबाने । एक एकराची । खरेंच मंजूर । जागा केली ॥४४॥
आणिक म्हटलें । व्यवस्था राखाल । देईन एकर । आणीकही ॥४५॥

नमो गजानना । बारावा अध्याय । मनी दृढ व्हावा । प्रार्थना गा ॥४६॥

=========

अध्याय १३

नमो गजानना । आपल्या कृपेने । आरंभ तेराव्या । अध्यायास ॥१॥

**(४८ अ)**

जमीन मिळाली । मठ बांधावया । वर्गणी पाहिजे । जमवीली ॥२॥
टीका करणाऱ्या । कांहींचे म्हणणें । भीक मागणें हें । संतनांवें ॥३॥
दैवी शक्ति जरी । मठ कशासाठी । स्वामीना हवा कीं । तुम्हालाच ॥४॥

जगदेव तेव्हां । टवाळखोराना । म्हणाले स्वामीना । नको कांहीं ॥५॥
आकाशाची छत्री । निजाया धरित्री । संग्रह कांही का । करतात ॥६॥
संत कार्यासाठी । देतां एकपट । दसपट हित । आपलेंच ॥७॥
वर्गणी जमली । कोट बांधावया । केली सुरवात । प्रथमतः ॥८॥

(४८ आ)

एकदा स्वामीनी । काय ठरवीलें । रेतीच्या गाडीत । चढले कीं ॥९॥
गाडीवान तेव्हां । खाली उतरला । स्वामींचा आग्रह । बैस जागी ॥१०॥
गाडीवान म्हणे । हनुमान श्रेष्ठ । रामभक्त जरी । तिष्ठतो ना ॥११॥
असो गाडी आली । बांधकामाजागी । स्वामीनी हेरली । एक जागा ॥१२॥
जेथे कां बैसले । स्वामी तयेवेळी । तेथेच समाधी । आज आहे ॥१३॥

(४८ इ)

स्वामीनी निर्देश । केला त्यानुसार । आंखणी जाहली । कोटासाठी ॥१४॥
अकरा गुंठ्यानी । जाहली अधिक । कोणाची कागाळी । दफ्तरात ॥१५॥
मोजणीस आले । जोशी अधिकारी । अयोग्य वाटले । दंड देणे ॥१६॥
आज्ञापत्र स्पष्ट । मिळतां भक्तांचा । उत्साह वाढला । मठासाठी ॥१७॥

(४९)

नंतर एकदा । गळत्या कुष्ठाचा । एक रोगी आला । मठाकडे ॥१८॥
सर्वड गांवचा । गंगाभारतीशा । नांवाचा गायक । परित्यक्त ॥१९॥
लोक बजावती । स्वामींचे चरण । नाही स्पर्शायाचे । ध्यान धरी ॥२०॥
एकदा स्वामीना । एकटे पाहून । धरीले चरण । अवचित ॥२१॥
स्वामीनी थप्पड । लाथाही मारून । ढकलूनी दिला । बाजूकडे ॥२२॥
कफाचा बडका । त्यावरी थुंकला । रागाने निघून । गेले स्वामी ॥२३॥
बडक्याचे झाले । मलम पाहून । सर्वांगी फांसला । आनंदाने ॥२४॥
किळसवाणे तें । करणें पाहून । पाटलानी त्याला । धिक्कारीले ॥२५॥
परि उत्तरला । कळली न तुम्हा । स्वामींची विचित्र । पहा कृपा ॥२६॥
स्वामीनी जेथेही । स्नान केले तेथे । जमीन सुगंधी । जाहलीसे ॥२७॥
तिथेच लोळण । घेईन मी आता । वाटतें होणार । चमत्कार ॥२८॥
नास्तिकास दिसे । केवळ ती माती । निरोगी जाहला । कुष्ठ देह ॥२९॥
गंगाभारतीचे । गान बहरले । निवांत आसरा । आश्रमात ॥३०॥
गांवाहून आली । पत्नी आणि मुलें । आग्रह करती । परतण्या ॥३१॥
गंगाभारती तो । त्याना उत्तरला । लटकी तुमची । माया पहा ॥३२॥
तुमचा मी नव्हे । स्वामींचा जाहलो । संसाराचे पाश । नको आता ॥३३॥

नंतर स्वामीनी । गंगाभारतीस । मलकापुरास । धाडीयेले ॥३४॥

**(५०)**

श्यामसिंग भक्त । आला शेगांवास । स्वामीना बोलावी । मुंडगांवी ॥३५॥
भंडाऱ्याकरीता । अमित लोकांची । दिंडीच निघाली । उत्साहात ॥३६॥
चतुर्दशी तिथी । त्याने योजलेली । रिक्त तिथी वर्ज्य । खरे तर ॥३७॥
स्वामींची सूचना । दुर्लक्षली त्याने । पाऊस पडला । पंक्तीवर ॥३८॥
अन्न वांया गेले । शेतीचीही हानी । होणारसी चिंता । सर्वां झाली ॥३९॥
श्यामसिंग तेव्हां । वरमूनी प्रार्थी । स्वामीना संकट । निवाराया ॥४०॥
स्वामीनी नजर । नेली गगनात । ढग दूर गेले । ऊन आले ॥४१॥
श्यामसिंगानेही । उद्या पौर्णिमेला । भंडारा घातला । आनंदाने ॥४२॥

**(५१)**

भक्त पुंडलिक । भोकरे नामक । वारी दरवर्षी । करीतसे ॥४३॥
वारीस निघता । लागण जाहली । ग्रंथीरोगाची ती । कणकण ॥४४॥
चालवेना तरी । वाहन अव्हेरी । गांठ वाढतेच । कांखेमध्ये ॥४५॥
रडतखडत । मठात पोचेतो । स्वामी खुणावती । दुरूनच ॥४६॥
स्वतःचीच कांख । दाबूनी जोराने । स्वामी ओरडले । गांठ गेली ॥४७॥
पुंडलीकाच्याही । तापाला पडला । तात्काळ उतार । आश्चर्य तें ॥४८॥

नमो गजानना । तेरावा अध्याय । मनी दृढ व्हावा । प्रार्थना गा ॥४९॥

=========

## अध्याय १४

नमो गजानना । आपल्या कृपेने । आरंभ चौदाव्या । अध्यायास ॥१॥

**(५२)**

तात्या बंडोपंत । नांवाचे ब्राम्हण । होते मेहकर । तालुक्याचे ॥२॥
त्याने उदारता । अवास्तव केली । त्याने झाले जीणे । दारिद्र्याचे ॥३॥
तगादे पाठीस । सावकाराचे नि । बायको मुलेही । भंडावती ॥४॥
जीव द्यावा किंवा । जावे हिमालयी । म्हणोनी सोडीले । घरदार ॥५॥
राख फांसूनीया । लंगोटी लावूनी । आला स्थानकास । प्रवासास ॥६॥
अनोळखी विप्र । म्हणे तेव्हा त्याला । हिमालयाआधी । शेगांवी जा ॥७॥
बंडूतात्यालागी । वाटले आश्चर्य । अनोळखी विप्र । मनकवडा ॥८॥
शेगांवी स्वामीनी । खूण सांगीतली । अनोळखी विप्र । भेटल्याची ॥९॥
प्राण का त्यागावा । हताश होऊन । कशासाठी जावे । हिमालयी ॥१०॥

कानात बोलले । बाभूळाजवळी । म्हसोबा मळ्यात । आहे गुप्त ॥११॥
एकटाच खण । मध्यरात्रवेळी । वावभर माती । काढूनीया ॥१२॥
मिळेल जें धन । त्याने कर्ज फेड । राही संसारात । संभाळून ॥१३॥
स्वामींचे सांगणे । तंतोतंत खरें । तांब्याची घागर । सांपडली ॥१४॥
चारशे मोहरा । पाहतां नाचत । स्वामींचा करी तो । जयजयकार ॥१५॥
स्थिति सुधारली । आला शेगांवासी । स्वामी सांगताती । उपदेश ॥१६॥
परोपकारही । करताना लक्ष्मी । आदर राखूनी । संभाळावी ॥१७॥

(५३)

असेच एकदा । मार्तण्ड पाटील । साधण्या अवस । सोमवती ॥१८॥
नर्मदेस जाण्या । करीती आग्रह । ती तो आहे नित्य । मजपाशी ॥१९॥
पर्वाची महती । मज नाही कांही । विघ्न ओढवेल । निष्कारण ॥२०॥
तरीही आग्रह । भक्तांचा अतीव । आले तीर्थस्थानी । सारे जण ॥२१॥
ओंकारेश्वराचे । दर्शनास सारे । स्वामीनी लावीले । पद्मासन ॥२२॥
परत निघता । स्वामींची सूचना । बैल करतील । अपघात ॥२३॥
सडकेने जाण्या । गर्दीही प्रचंड । नावेने निघाले । खूप लोक ॥२४॥
सर्वांसमवेत । स्वामीही चढले । खडकावरती । आदळली ॥२५॥
बुडाया लागली । नौका खालीखाली । उडी टाकोनीया । माजी गेला ॥२६॥
भयभीत भक्तां । स्वामी सांगताती । आता नर्मदेचा । धावा करा ॥२७॥
स्वामींचा आदेश । भक्तानी पाळतां । पात्रात कोळीण । प्रकटली ॥२८॥
कोण तूं प्रश्नाच्या । उत्तरी म्हणाली । ॐकार-सन्तान । मज जाणा ॥२९॥
नर्मदाच नांव । जळ हेंच रूप । ओलेच वसन । नित्य माझे ॥३०॥
सहज नावेस । ढकलूनी तिने । किनारी लावीली । अलगद ॥३१॥
सारे सुखरूप । वळून पाहती । कोळीण अदृश्य । गेली कोठे ॥३२॥
स्वामीना पुसता । म्हणाले कोळीण । होती ती स्वतःच । नर्मदा ना ॥३३॥

(५४)

संत माधवनाथ । चित्रकूटवासी । त्यांचा माळव्यात । शिष्यगण ॥३४॥
शेगांवास आले । त्यांचे एक शिष्य । नांव सदाशिव । वानवळे ॥३५॥
भजन संपता । स्वामींनी म्हटलें । सदाशिवरावाना । सहजीच ॥३६॥
इतुक्यात येथे । येऊनीया गेले । माधवनाथचि । काय म्हणूं ॥३७॥
चुकामूक झाली । थोडा वेळ आधी । येते तरी होती । गुरुभेट ॥३८॥
खुणेसाठी परि । म्हटले हा विडा । त्यांचा जो राहीला । सवें न्यावा ॥३९॥
सदाशिव जेव्हां । गुरूंना भेटले । विड्याची ती पाने । देते झाले ॥४०॥

माधवनाथानी । तेव्हां सांगीतले । योगसिद्धीमुळे । भेट होते ॥४१॥
शेगांवास गेलो । जेवणही केले । विडा तो राहीला । घ्यावयाचा ॥४२॥

नमो गजानना । चौदावा अध्याय । मनी दृढ व्हावा । प्रार्थना गा ॥४३॥

=========

अध्याय १५

नमो गजानना । आपल्या कृपेने । सुरू पंधरावा । अध्याय हा ॥१॥

(५५)

शिवजन्मोत्सव । अकोल्यात शके । अठराशे तीस । वैशाखात ॥२॥
सभेचे अध्यक्ष । लोकमान्य होते । स्वामींचा आशिष । मिळावा कीं ॥३॥
सभेला येण्याची । विनंति कराया । खापर्डे वकील । स्वतः आले ॥४॥
स्वामीनी स्वतःच । म्हटले सभेत । असतील दोन । थोर व्यक्ति ॥५॥
टिळक नि अण्णा । पटवर्धनही । येईन देखेन । दोघानाही ॥६॥
टिळकानी दिला । लोकाना आठव । समर्थांची कृपा । शिवराया ॥७॥
आज नष्टचर्य । दास्यत्वाचे आहे । शिक्षणाने व्हावे । राष्ट्रप्रेम ॥८॥
परदेशी राजा । ऐसे कां शिक्षण । जाणूनबुजून । देईल हो ॥९॥
ऐकूनी भाषण । ऐसे रोखठोक । स्वामीजी बोलले । भविष्य कां ॥१०॥
ऐशा बोलण्याने । काढण्या नाही कां । दोन्ही दंडावरी । पडतील ॥११॥
स्वामी जे बोलले । तैसेच जाहले । बंदीत टाकले । टिळकाना ॥१२॥
राजद्रोहामुळे । खटले भरले । मुंबईच्या वाऱ्या । खापर्ड्याना ॥१३॥
खापर्ड्यांचे सवे । कोल्हटकरही । निघाले असतां । मुंबईला ॥१४॥
खापर्ड्यानी तेव्हां । कोल्हटकराना । शेगांवा धाडीले । आशीर्वादा ॥१५॥
स्वामीनी म्हटले । यश ना येईल । शिवाजीस सुद्धा । कैद झाली ॥१६॥
परि ही भाकर । खाववा टिळका । कांही थोरकार्य । घडवेल ॥१७॥
टिळकांचे तोंडी । दात नसल्याने । भाकर सेवीली । कुस्करून ॥१८॥
म्हटले त्रिकाल । जाणताती साधू । पाहू कामगिरी । आतां काय ॥१९॥
मंडाले येथील । कारागृही ग्रंथ । गीतारहस्याचा । सिद्ध झाला ॥२०॥

(५६)

भक्त कोल्हापुरी । श्रीधर काळे हा । योजी विद्यार्जन । परदेशी ॥२१॥
निघण्याचे आधी । दर्शनास आला । शब्द बोलवेना । स्वामींपुढे ॥२२॥
स्वामीच म्हणती । भौतिकशास्त्राची । नको अभिलाषा । व्यर्थ गोष्ट ॥२३॥
भारतात जन्म । हेंच थोर पुण्य । योग नि अध्यात्म । अभ्यासावें ॥२४॥

ज्ञान हें मिळतां । होशील कृतार्थ । कशास तूं जाशी । जपानला ॥२५॥
इथेच होईल । अभ्युदय मान । परतूनी जाई । कोल्हापुरा ॥२६॥
स्वामींचा आदेश । मानीतां भूषवी । प्राचार्यपदाला । कालांतरें ॥२७॥

नमो गजानना । पंधरावा अध्याय । मनी दृढ व्हावा । प्रार्थना गा ॥२८॥

==========

अध्याय १६

नमो गजानना । आपल्या कृपेने । आरंभ सोळाव्या । अध्यायास ॥१॥

**(५७)**

मुंडगावातील । भक्ता पुंडलीका । आग्रह करीते । भागाबाई ॥२॥
अंजनगांवासी । जाऊनीया घेऊं । केकाजीशिष्याचा । कानमंत्र ॥३॥
स्वप्नांत स्वामीनी । केला मंदस्वरें । गण गण् गणात । बोते मंत्र ॥४॥
पुसलें आणीक । तुला कांहीं हवें । पादुका मागतो । पुंडलीक ॥५॥
दुसरे दिवशी । आली भागाबाई । पुंडलीक नाही । जाण्या राजी ॥६॥
पादुकांची वाट । पाहतो विश्वासे । होतील स्वप्नीचे । बोल सत्य ॥७॥
शेगांवाहूनचि । मुंडगांवी येण्या । भक्त झ्यामसिंग । निघालेला ॥८॥
स्वामीनी म्हटले । माझीया पादुका । नेऊनी या देई । पुंडलीकां ॥९॥
वाटेतच त्याला । दिसे पुंडलिक । प्रसाद कांही कां । पुसे आर्त ॥१०॥
आश्चर्य जाहले । झ्यामसिंगालाही । वृत्तांत ऐकून । स्वप्नातील ॥११॥

**(५८)**

अकोल्यात एक । सावकार पुत्र । त्र्यंबक कंवर । स्वामीभक्त ॥१२॥
उच्चशिक्षणास । हैद्राबादी राहे । सुट्टीमध्ये आला । अकोल्यास ॥१३॥
मातृहीन भाऊ । म्हणे वहिनीस । स्वामीना भोजन । द्यावें वाटे ॥१४॥
भाकर पिठले । मिर्ची आणि कांदा । साधेच भोजन । घेऊनीया ॥१५॥
पोचतां स्टेशनी । उशीर जाहला । पुढील गाडीने । मग आला ॥१६॥
तिकडे शेगांवी । ताटे वाढलेली । नाना पक्वान्नांची । होती जरी ॥१७॥
स्वामी म्हणताती । माझे तो भोजन । चवथे प्रहरी । नका थांबू ॥१८॥
भोजन घेऊन । भाऊ येत आहे । माहीत स्वामीना । अंतर्ज्ञानें ॥१९॥
त्र्यंबक पोचतां । स्वामीनी म्हटलें । किती बा विलंब । केलास तूं ॥२०॥
पक्वान्नाचे नाही । कौतुक मानीले । भाकरी चवीने । खाते झाले ॥२१॥

**(५९)**

शेगांवात एक । शेतकरी त्याचे । नांव तुकाराम । शेगोकार ॥२२॥

स्वामीना चिलीम । भरून देण्याचे । काम करीतसे । भक्तिप्रेमें ॥२३॥
बसलेला होता । शेतांत अपुल्या । ससा कीं मारीला । शिकाऱ्याने ॥२४॥
बंदुकीचा छर्रा । याचेच कानाचे । जवळी घुसला । अडकला ॥२५॥
डॉक्टरानी खूप । यत्न जरी केले । छर्रा तो निघेना । कांही केल्या ॥२६॥
तुकारामालागी । डोकेदुखी झाली । कांही केल्या स्वस्थ । वाटेना कीं ॥२७॥
दुसऱ्या भक्ताने । म्हटले उपाय । आतां फक्त एक । गुरुसेवा ॥२८॥
मठ झाडण्याचे । काम स्वीकारूनी । सेवा त्याने केली । चौदा वर्षे ॥२९॥
एके दिनी ऐसा । मठ झाडताना । छर्रा अचानक । निघाला कीं ॥३०॥
स्वस्थता वाटली । परि त्याने सेवा । चालूच ठेवली । निरंतर ॥३१॥

नमो गजानना । सोळावा अध्याय । मनी दृढ व्हावा । प्रार्थना गा ॥३२॥
==========

अध्याय १७

नमो गजानना । आपल्या कृपेने । आरंभ सत्राव्या । अध्यायास ॥१॥

**(६०)**

स्वामी अकोल्यात । असताना एका । भक्ताचे मनांत । काय आलें ॥२॥
विष्णूसा नामक । म्हणे भास्करास । मलकापुरास । न्यावे वाटे ॥३॥
तैसाच आग्रह । भास्कराने केला । स्वामींचा इशारा । हट्ट व्यर्थ ॥४॥
तरी भास्कराने । केली गाडीमध्ये । आसने राखीव । परस्पर ॥५॥
स्वामीना म्हटलें । विष्णूसास दिलें । वचन स्वामीना । आणीनसे ॥६॥
स्वामीनी म्हटलें । संकटास तुझे । आमंत्रण मात्र । पाही आतां ॥७॥
गाडी जैसी आली । अकोला स्टेशनी । राहीले बसून । फलाटावर ॥८॥
गाडी सुरू होतां । राखीव डब्यातं । न जातां शिरले । स्त्रियांचेंच ॥९॥
नग्न वावरतां । रेल्वेचा कायदा । मोडल्याने आलें । वॉरंट कीं ॥१०॥
अटक कराया । आला जो शिपाई । त्याचाच धरीला । हात घट्ट ॥११॥
जठारसाहेब । तेव्हां पाठवीती । मन वळवीण्या । देसायाना ॥१२॥
कोर्टात नेण्यास । कष्टाने धोतर । नेसवीले मार्गी । फेडलेच ॥१३॥
जठारसाहेब । गुन्हा विवरती । स्वामी तिकडे न । लक्ष देती ॥१४॥
वायफळ गप्पा । म्हणत भास्करा । म्हणती चिलीम । भरून दे ॥१५॥
जठार मनात । करीती विचार । अवधूता काय । जनरीत ॥१६॥
भास्करास हवे । होते तारतम्य । पांच रुपे दंड । त्यास केला ॥१७॥
स्वामीनी म्हटले । झाली ना फजीती । हट्ट निष्कारण । केलास तूं ॥१८॥

तेव्हांपासूनीया । रेलगाडी वर्ज्य । त्यांचे प्रवासास । बैलगाडी ॥१९॥

**(६१)**

एकदा अकोला । गांवास गेलेले । बापूरावांचे कीं । घरी वास ॥२०॥
कुरूम गांवच्या । मेहताबशाने । निरोप दिलेला । भेटीसाठी ॥२१॥
यवन मित्राना । घेऊनी राहीला । बापूरावांचेच । घरीं तेव्हां ॥२२॥
दुसरे दिवशी । स्वामीनी बोकाट । मेहताबशाचे । धरीयेले ॥२३॥
दणादण मार । स्वामीनी दिधला । मुकाट्याने त्याने । सोशीयेला ॥२४॥
पाहूनी भ्यालेल्या । मित्राना परत । जाण्यास बोलला । मेहताबशा ॥२५॥

**(६१ अ)**

मित्र गेले आणि । बच्चूलाल आला । स्वामीना भोजना । बोलवाया ॥२६॥
टांगा पोहोचला । घरी तरी स्वामी । नाही उतरत । टांग्यातून ॥२७॥
तर्क तेव्हां केला । भक्ताने ऐसा कीं । मेहताबास ना । बोलावीले ॥२८॥
चूक समजतां । त्यालाही आणीलें । उतरवीले त्यास । नाट्यगृही ॥२९॥
स्वामींची व्यवस्था । रामाचे मंदीरी । खपला नाहीच । हाही भेद ॥३०॥
स्वामी स्वतःहून । नाट्यगृही गेले । तेथेच भोजने । मग झाली ॥३१॥

**(६१ आ)**

मेहताब सांगे । आतां मज जाणें । स्वामींचे आज्ञेने । पंजाबला ॥३२॥
मित्रांचे म्हणणें । मशीद बांधणें । राहील ना काम । तुम्ही जातां ॥३३॥
त्यानें आश्वासीलें । स्वामी असताना । काम न अडेल । मुळीसुद्धा ॥३४॥
मंदीर-मस्जिद । स्वामीना समान । कार्यपूर्ती होते । त्यांच्या कृपें ॥३५॥

**(६१ इ)**

बापूरावांच्या त्या । कांतेस बाधली । करणी ती गेली । स्वामीकृपें ॥३६॥

**(६२)**

नरसिंगजी जे । होते अकोट्यात । संतबंधूंमध्ये । दाट प्रेम ॥३७॥
स्वामीच अकोटी । आले उठाउठी । विहिरीचे कांठी । बसलेले ॥३८॥
वांकून पाहसी । पुनःपुन्हा कां रे । नरसिंगजीनी । विचारलें ॥३९॥
गंगा गोदा त्याही । स्नान या तीर्थात । करती कोरडा । मीच मात्र ॥४०॥
तीर्थाने येऊन । न्हाऊं घालावें तों । बसून राहीन । येथेच मी ॥४१॥
छंदिष्ट दिसतो । ऐसी परस्पर । लोकांत जाहली । कुजबूज ॥४२॥
तरी कुतूहलें । रेंगाळले तेथें । जळ अवचित । तुडुंबलें ॥४३॥
कारंज्यापरी की । जळ उसळले । स्वामी बोलाबीती । या हो या हो ॥४४॥
भाविकांनी केले । उत्साहाने स्नान । नास्तिकांची झाली । खाली मान ॥४५॥

स्नाने झाल्यावरी । पाणी गेले खाली । खोल जैसे होते । तैसे पुन्हा ॥४६॥

नमो गजानना । अध्याय सत्रावा । मनी दृढ व्हावा । प्रार्थना गा ॥४७॥

==========

अध्याय १८

नमो गजानना । आपल्या कृपेने । सुरू अठरावा । अध्याय हा ॥१॥

(६३)

मुंडगांवी एक । बायजा मुलगी । बालपणी सुद्धा । स्वामीभक्त ॥२॥
विवाह जाहला । परि दुर्दैवाने । तिचा पति होता । नपुंसक ॥३॥
तिच्या सौंदर्याने । थोरला भावोजी । कराया धजला । एकांत कीं ॥४॥
अचानक तेव्हां । त्याचाच मुलगा । जिन्याचेवरूनी । कोसळला ॥५॥
पोरास मस्तकी । मार बसल्याने । पाप कर्माविशी । वरमला ॥६॥

(६३ अ)

पिता त्यानंतर । घेऊनीया आला । स्वामींचे दर्शना । बायजाला ॥७॥
पुत्रप्राप्ती नाही । हिचे नशिबात । स्पष्टच बोलले । स्वामी तेव्हा ॥८॥

(६३ आ)

तरीही स्वामीना । मानूनी सद्गुरु । येती झाली सवें । पुंडलिक ॥९॥
साथ संगत ती । पाहूनीया लोक । कराया लागले । कुजबूज ॥१०॥
स्वामीनीच मग । निर्वाळा दिधला । दोघांचे संबंध । निर्मळचि ॥११॥

(६४)

खामगांवामध्ये । कुंवरास अंगी । फोड उठलेले । दुःख भारी ॥१२॥
डॉक्टर भावाने । केले उपचार । परि सल नाही । कमी झाली ॥१३॥
स्वामीपदी निष्ठा । कुंवरास होती । सुरू केली त्याने । प्रार्थनाही ॥१४॥

(६४ अ)

रात्री अचानक । दमणी दारांत । ब्राम्हण तीतून । उतरला ॥१५॥
नांव म्हणे गजा । आलो शेगांवीचा । अंगारा नि तीर्थ । घेऊनीया ॥१६॥
कुंवर लवूनी । हाती घेई तीर्थ । आणि मग वर । बघितले ॥१७॥
नव्हता ब्राम्हण । कोणीही समोर । दारात नव्हती । दमणीही ॥१८॥
तीर्थाचे होतेच । आचमन केले । अंगाऱ्याची पुडी । मांडीपाशी ॥१९॥

(६४ आ)

फोड बरे झाले । कुंवर स्वामींचे । दर्शन घेण्यास । शेगांवास ॥२०॥
आला तेव्हां स्वामी । विचारती त्यास । बैलाना पुसीले । पाणी काय ॥२१॥

(६५)

पांच पन्नासाना । घेऊनीया स्वामी । आले पंढरीला । आषाढात ॥२२॥
समवेत होता । भक्त बापू काळे । त्याचा वेळ गेला । स्नानामुळे ॥२३॥
दर्शन चुकले । विठोबारायाचे । मनात दाटली । हळहळ ॥२४॥
प्रभूला सांकडे । घालण्या उपास । करीतां स्वामीना । दया आली ॥२५॥
वाड्यात दर्शन । विठ्ठलाचे दिले । जैसा देवळांत । हुबेहुब ॥२६॥

(६६)

द्वादशी तिथीस । अचानक मरी । पंढरपुरात । पसरली ॥२७॥
शेगांवीचे लोक । कुकाजीचा वाडा । सोडूनी निघाले । लगबगा ॥२८॥
कवठे गांवीचा । माळकरी परी । सांथीचे आहारी । सांपडला ॥२९॥
निपचित होता । तो तरी झालेला । हात पुढे केला । स्वामीनीच ॥३०॥
म्हणाले जाऊं या । चल वऱ्हाडास । उठवत नाही । कैसा येऊं ॥३१॥
कैसे परतणे । मृत्यू तो समीप । स्वामीनी म्हटलें । धीर धरी ॥३२॥
मस्तकी ठेऊनी । हात त्या वेळेला । म्हटले टळला । मृत्यू तुझा ॥३३॥
तापाची लक्षणे । उतरली आणि । आली कांही शक्ति । आश्चर्य तें ॥३४॥
मृत्यूचा जबडा । फाडूनी मजला । काढीले म्हणत । भक्त झाला ॥३५॥

(६७)

एकदा दर्शना । ब्राम्हण आलेला । विधिनिषेधांच्या । गांठी मनी ॥३६॥
एक काळे कुत्रे । वाटेत मेलेले । पहा याला कां न । उचलले ॥३७॥
कोणालाही खंत । नाही शिवाशिव । उगाच कीं आलो । ऐशा गांवा ॥३८॥
जाणूनीया मन । स्वामी अचानक । ब्राम्हणासमोर । स्वतः उभे ॥३९॥
म्हणती कशास । व्हावे बा दुश्चित्त । कुत्रे हें जिवंत । झोपलेलें ॥४०॥
चला आणूं पाणी । म्हणत पाऊल । टाकता कुत्र्यास । स्पर्श झाला ॥४१॥
कुत्रें तें उठलें । ब्राम्हण दिङ्मूढ । पश्चात्ताप त्यास । तेव्हां झाला ॥४२॥
योग्यतेची जाण । नसताना निंदा । केली त्या खंतेने । क्षमा मागे ॥४३॥

नमो गजानना । अठरावा अध्याय । मनी दृढ व्हावा । प्रार्थना गा ॥४४॥

=========

अध्याय १९

नमो गजानना । आपल्या कृपेने । सुरू अध्याय हा । एकोणीसावा ॥१॥

(६८)

खामगांवाहूनी । काशिनाथ आला । लक्षणें पाहूनी । आनंदला ॥२॥

वडिलानी होती । जैसी सांगितली । तैसीच देखीली । स्वामींचीही ॥३॥
त्यावेळी स्वामीनी । म्हटले तयास । तारवाला तुझी । वाट पाहे ॥४॥
काम झाले तुझे । त्यांच्या बोलण्य़ाचा । अर्थ नाही आला । त्यास ध्यानी ॥५॥
गांवीं परततां । मिळाल्या तारेचा । मजकूर होता । मुन्सफीचा ॥६॥

**(६९)**

धनिक गोपाळ । बुट्टीने स्वामीना । नेऊन कोंडीलें । नागपुरी ॥७॥
ब्राम्हणभोजने । नित्य भजनेंही । शेगांवकराना । मज्जावचि ॥८॥
उदास लोकांनी । शेगांवी जमून । हरि पाटलास । विनविलें ॥९॥
जत्था घेऊनीया । पाटील पोंचलें । बुट्टींचे सदनी । नागपुरी ॥१०॥
ढकलूनी दिला । द्वारपाल आणि । पंक्तीत शिरला । भक्तगण ॥११॥
स्वामीही स्वतःच । उठोनीया मिठी । मारते जाहले । पाटलास ॥१२॥
स्वामीनीच केले । लोकांचे स्वागत । पाहूनी बुट्टीनी । जाणीलें कीं ॥१३॥
भरल्या ताटांचा । नको अवमान । दीन विनवणी । करी तेव्हां ॥१४॥
हरी पाटलास । बुट्टीनी म्हटलें । सर्वांनी प्रसाद । घ्यावा बरें ॥१५॥

**(६९ अ)**

निघतां स्वामीनी । पत्नी जानकीस । पुत्रप्राप्तीवर । प्रेमें दिला ॥१६॥

**(७०)**

परतीचे मार्गी । रघुजी भोसले । भेटले तेथील । संस्थानिक ॥१७॥
शेगांवी नंतर । कितीक तपस्वी । आणि साधु येती । भेटावया ॥१८॥
वासुदेवानंद । सरस्वती यांचे । येण्याचे माहीत । झाले तेव्हां ॥१९॥
प्रसंग साधून । शंका कितीएक । विचारीता झाला । बाळाभाऊ ॥२०॥
कर्म भक्ति ज्ञान । त्यास विवरीले । मार्ग वेगळाले । साध्य एक ॥२१॥

**(७१)**

साळूबाईलागी । स्वैपाकाची रीती । सांगीतली अन्न । प्रिय होण्या ॥२२॥

**(७२)**

जलंब गांवीच्या । आत्मारामें होते । वेद शिकलेले । गंगातीरी ॥२३॥
उच्चारी प्रमाद । होतां लगोलग । सुधारून देती । स्वामी त्याला ॥२४॥
थोरवी कळतां । स्वामीसेवी रत । राहीला शेगांवी । कायमचा ॥२५॥
सारी मिळकत । मठास अर्पिली । विचार टाकीले । बाकी सारे ॥२६॥

**(७२ अ)**

आणीकही दोघे । असेच देऊनी । सारी मालमत्ता । धन्य झाले ॥२७॥

**(७३)**

मारुतीपंतांचे । बाळापुरी शेत । राखायाचे काम । तिमाजीस ॥२८॥
डोळा लागला नि । नाहीच कळले । गाढवें शिरली । कुंभाराची ॥२९॥
निद्रेतच हांक । स्वामीनी दिधली । अदृश्यही झाले । लगेचच ॥३०॥
जोंधळ्याची रास । अर्धी फस्त झाली । कबूली कथिली । तिमाजीने ॥३१॥
शेगांवी जाण्याचे । मारुतीपंतांचे । मनी असल्याने । बोलले ना ॥३२॥
स्वामीनी स्वतःच । पिकाची नासाडी । तिमाजीची खूण । सांगीतली ॥३३॥
व्हावें क्षमावंत । धरावी सबूरी । स्वामींचा मानीला । उपदेश ॥३४॥

**(७४)**

बाळापुरीं स्वामी । सुखलालाचिये । बैठकी बैसले । अवधूत ॥३५॥
नारायणनामें । हवालदारास । त्यांना पाहूनीया । चीड आली ॥३६॥
स्वामीना जोशात । झोडपलें त्याने । जरी समजावी । हुंडीवाला ॥३७॥
साधूला मारून । सर्वनाशालाच । कशास देतोसी । आमंत्रण ॥३८॥
ऐकलेच नाही । पुढे झाली दैना । आप्तेष्ट निमाले । स्वतः सुद्‌धा ॥३९॥

**(७५)**

संगमनेरच्या । हरी जाखाडीच्या । मनांत रमली । विवाहेच्छा ॥४०॥
इच्छेची तुच्छता । पाहून थुंकले । तरीही तथास्तु । वर दिला ॥४१॥

**(७६)**

वासुदेव बेन्द्रे । आणि त्यांचा मित्र । रामचंद्र नाम । निमोणकर ॥४२॥
संचार करीत । आले अरण्यात । मुकना निर्झर । तिथे होता ॥४३॥
स्थान तें प्रसिद्‌ध । कपिलधारातीर्थ । योगाभ्यासीं रस । रामचंद्रा ॥४४॥
समोर देखतां । योगीराज ध्यानी । प्रणाम करूनी । उगा उभा ॥४५॥
त्याचे मनोगत । जाणूनी योग्याने । नेत्र उघडले । समाधानें ॥४६॥
एक चित्रपट । तांबडा खडाही । रामचंद्रालागी । भेट दिला ॥४७॥
योगीराज झाला । क्षणैकात गुप्त । पुन्हा तो दिसला । नाशकात ॥४८॥
कोण तुम्ही प्रश्नी । नर्मदेचा खडा । दिला तो मीच बा । गजानन ॥४९॥
धुमाळांचे घरी । पुनश्च दिसतां । रामचंद्र सांगे । अनुभव ॥५०॥
धुमाळ सांगती । खड्याचे करावें । नेमाने पूजन । भावपूर्ण ॥५१॥

**(७७)**

शेगांवी कोकाटे । तुकाराम यांना । संतति जगत । नाही चिंता ॥५२॥
नवस बोलले । जगेल संतति । करीन अर्पण । एक तुला ॥५३॥
बोलल्या नवसा । विसर पडतां । वडील मुलगा । अत्यवस्थ ॥५४।
आठव जाहला । बोलले हा पुत्र । नारायण तुज । अर्पीयेला ॥५५॥

व्याधी बरी झाली । मठद्वारी त्याला । सोडीला आजन्म । सेवेसाठी ॥५६॥

(७८)

एकोणीश्शे दहा । साली पंढरीस । आषाढीनिमित्ते । होते आले ॥५७॥
विठ्ठला म्हणाले । भाद्रपदमासी । यावेसे वाटते । वैकुंठास ॥५८॥
स्वामींचे नयनी । पाहूनीया अश्रु । हरी पाटलास । चिंता झाली ॥५९॥
तुजला विषय । नाही कळायचा । संगत आपुली । थोडी आतां ॥६०॥

(७८ अ)

परतल्यावर । गणेशचतुर्थी । सणाची प्रतिष्ठा । झाली तेव्हां ॥६१॥
स्वामीनी लोकाना । म्हटले आजचा । दिवस समजा । अखेरचा ॥६२॥
गेलो ऐसे मनी । कधीही न आणा । केवळ देहाचे । विसर्जन ॥६३॥
पंचमीचे दिनी । बाळाभाऊ यांसी । निजासनी केलें । स्थानापन्न ॥६४॥
"जय गजानन" । ऐसे बोलोनीया । अचल शरीरें । समाधिस्थ ॥६५॥

(७८ आ)

भक्तानी पालखी । वाहूनी शेगांवी । दर्शन गांवास । घडवीलें ॥६६॥
परिमल द्रव्यें । मूर्तीस सिंचूनी । समाधीचे जागीं । विसावली ॥६७॥

नमो गजानना । एकोणीसावा हा । मनी दृढ व्हावा । प्रार्थना गा ॥६८॥

=========

अध्याय २०

नमो गजानना । आपल्या कृपेने । आरंभ वीसाव्या । अध्यायास ॥१॥

शरीर टाकलें । तरी श्रद्धावंता । दर्शन दृष्टांत । अजूनही ॥२॥

(७९)

शेगांवी कोठाडे । नांव गणपत । दुकानधारक । भक्त एक ॥३॥
असेच एकदा । मनी आले त्यास । घालावें भोजन । ब्राम्हणास ॥४॥
अभिषेक आणि । भोजनासाठीचे । सामान मठात । पाठवीले ॥५॥
पत्नी करे टीका । वाऊगा हा खर्च । अशाने संसार । चालेल कां ॥६॥
पत्नीचे विचार । इतुके वेगळे । असतां सचिंत । गणपत ॥७॥

(७९ अ)

स्वामीनी पत्नीस । दृष्टांत देऊनी । छळूं नको ऐसे । सांगीतलें ॥८॥
पतीने योजीले । परमार्थकार्य । अहित ना होणे । तेणें कांही ॥९॥
सकाळीं उठतां । तिने तो दृष्टांत । स्वप्नीचा पतीस । सांगीतला ॥१०॥

चिंता ती संपली । साथसंगतीनें । केला परमार्थ । आनंदानें ॥११॥
(८०)
लक्ष्मण जांजळ । नामक भक्ताला । घराचा वैताग । आला होता ॥१२॥
व्यापाराचे कामी । मुंबैस आलेला । घरी परताया । स्टेशनात ॥१३॥
परमहंसांच्या । वेषांत स्वामीनी । हटकले त्याला । अचानक ॥१४॥
स्वामींच्या शिष्याने । हताश कां व्हावें । जावें परतोनी । विश्वासाने ॥१५॥
सांगूनीया खुणा । आणीकही त्याची । विश्वास नि श्रद्धा । दृढ केली ॥१६॥
खाली वांकूनीया । नमन करीतों । स्वामी अंतर्धान । पावलेले ॥१७॥
तेव्हापासूनीया । जांजळ करीतो । नेमाने साजरी । पुण्यतिथी ॥१८॥
(८१)
जोशी अधिकारी । काम आटपोनी । बैलगाडीने कीं । निघालेले ॥१९॥
वाटेत उठले । वादळ नदीला । पूर आला गाडी । जावी कैसी ॥२०॥
गाडीवान तरी । होता भयभीत । जोशींचा आग्रह । जाया हवें ॥२१॥
पाणी चढतेच । बैल बिथरले । गाडीवान सोडे । कासराही ॥२२॥
दोघेही मिळून । डोळे मिटूनीया । करताती धावा । गजानना ॥२३॥
आश्चर्य जाहले । डोळे उघडतां । होते शेगांवात । सुखरूप ॥२४॥
साक्ष पटल्याने । ब्राम्हणभोजन । आणि दानधर्म । केला बहु ॥२५॥
(८२)
यादव गणेश । सुभेदार याना । कपाशीधंद्यात । झाला तोटा ॥२६॥
वर्ध्यात मित्राचे । आसिरकरांचे । घरी बसलेले । चिंतेतच ॥२७॥
लोचट म्हातारा । भिकारी मागतो । आणीक आणीक । भिक्षा किती ॥२८॥
प्रचंड तोट्याने । आधीच त्रासलों । तेंही सांगीतलें । भिकाऱ्यास ॥२९॥
गजानन देता । नको कांही शंका । स्थिती सुधारेल । पहा कैसी ॥३०॥
भिक्षेकरी गुप्त । झाला कोठे गेला । ओळख स्वामींची । देऊनीया ॥३१॥
कपाशीला तेजी । पुन्हा आली नफा । प्रचंड जाहला । यादवास ॥३२॥
(८३)
डॉक्टर कुंवर । राजारामभाऊ । जाई खामगांवा । नोकरीस ॥३३॥
तेल्हाऱ्यापासून । निघतां वाटेत । शेगांवी दर्शन । समाधीचे ॥३४॥
एकदा प्रसाद । अव्हेरूनी गेला । मार्गच चुकला । अपरात्री ॥३५॥
मनोमनी क्षमा । मागीतली तेव्हां । सहजचि आला । शेगांवात ॥३६॥
प्रसाद घेऊनी । पुनश्च निघाला । मुक्कामी पोचला । व्यवस्थित ॥३७॥
(८४)

भावसार ह्यांचा । एकच वर्षाचा । बाळ दिनकर । व्याधिग्रस्त ॥३८॥
उपाय थकले । एकच कर्तव्य । समाधीचे द्वारी । ठेवीयेले ॥३९॥
बाप रतनशाने । नवस बोलीला । पांच रुपयांचा । काकुळती ॥४०॥
ना तरी मस्तक । फोडीन बोलला । चळवळ करी । बाळ तेव्हां ॥४१॥
आधी निपचित । होता पडलेला । सजीव जाहली । गात्रे सारी ॥४२॥
(८५)
उदाहरणांचा । नाही तुटवडा । रामचंद्रकन्या । चंद्रभागा ॥४३॥
प्रसूती जवळ । असताना तिला । नवज्वरव्याधी । बाधली कीं ॥४४॥
उपाय थकतां । पाटील पोरीस । तीर्थ नि अंगारा । देता झाला ॥४५॥
(८५ अ)
पत्नीही पीडित । वातविकाराने । वेडीपिशी वागे । निरुपायें ॥४६॥
रामचंद्र करी । सूचना तिजला । प्रदक्षिणा घाली । समाधीस ॥४७॥
पतीची सूचना । मानीता विकार । कांही दिवसांत । बरा झाला ॥४८॥
(८६)
नवस फेडणे । व्हावें विधियुक्त । बाळाभाऊ यांचा । अधिकार ॥४९॥
नंतर दृष्टांतें । नांदुरे गांवीचा । नारायण माळी । यांचेकडे ॥५०॥

नमो गजानना । अध्याय वीसावा । मनी दृढ व्हावा । प्रार्थना गा ॥५१॥
==========
अध्याय २१
नमो गजानना । आपल्या कृपेने । एकवीसाव्याची । सुरवात ॥१॥
(८७)
स्वामी दिवंगत । तरीही चालूच । भक्तांची काळजी । वाहणेचे ॥२॥
(८८)
मंदीर बांधता । मजूराचे हाती । दगड असतां । तोल गेला ॥३॥
लागले रे काय । लोक विचारती । मजूर म्हणतो । मुळी नाही ॥४॥
कोणीतरी मला । अल्गद धरीले । जमीनीवरती । ठेवीयेले ॥५॥
स्वामीनीच माझा । केला प्रतिपाळ । कामात अपेश । नाही आले ॥६॥
(८९)
राजस्थानामध्ये । जयपूर गांवी । बाईला सतावे । भूतबाधा ॥७॥
दत्तात्रेय देती । स्वप्नात दृष्टांत । जाई शेगांवास । लाभदायी ॥८॥
रामनवमीचा । मुहूर्त धरावा । पिशाच्चाची मुक्ति । होईल गे ॥९॥

अश्मस्तंभ उभे । करायाचे काम । उत्सवाकारणे । थांबलेले ॥१०॥
खांबास टेकूनी । होती बाई उभी । खांब सरकला । गर्दीमुळे ॥११॥
खांबाची शिळाच । पडली तिजवर । कष्टाने लोकांनी । हटवीली ॥१२॥
ऐसी जड शिळा । अंगावर येतां । जाहले असेल । तिचे काय ॥१३॥
आश्चर्य ती होती । सुरक्षित परि । दणका पिशाच्चा । पत्थराचा ॥१४॥

**(९०)**

नाईकनवरे । यांचेही मस्तकी । तुळई पडली । मंडपाची ॥१५॥
जणूं हार कोणी । शिरी चढवीला । असेच गमले । त्याना तरी ॥१६॥

**(९१)**

एकदा पाटील । रामचंद्रांकडे । भुकेला गोसावी । दारी आला ॥१७॥
पाटील चाणाक्ष । ओळखीले स्वामी । भोजन सत्वर । वाढीयेले ॥१८॥
दक्षिणा म्हणून । पांच रुप्ये दिले । गोसावी सांगतो । ही तो नको ॥१९॥
मठात हिशेब । ठेवण्याचे काम । झाले पाहीजे तें । सचोटीने ॥२०॥
सारा व्यवहार । नीट संभाळावा । सेवा तीच माझी । दक्षिणा बा ॥२१॥

**(९१ अ)**

जेथे जेथे माझे । उच्छिष्ट सांडले । द्रव्याचा वाहेल । पूर तिथे ॥२२॥

**(९१ आ)**

पुत्राचे गळ्यात । ताईत बांधला । पत्नीसही दिले । समाधान ॥२३॥
सारे बजावूनी । निरोप घेतला । गोसावी पावला । अंतर्धान ॥२४॥

**(९२)**

बत्तीस वर्षांचे । सदेह जीवन । आजही अखंड । कृपामय ॥२५॥

**(९३)**

ऐशा चरित्राचे । होवो पारायण । वाढो भक्तिभाव । समाधानें ॥२६॥
सारे जग असो । सुखी निरामय । चरणी प्रार्थना । गजानना ॥२७॥
सारे जग असो । सुखी निरामय । चरणी प्रार्थना । गजानना ॥
ॐ सह नाववतु । सह नौ भुनक्तु ।
सह वीर्यं करवावहै ।
तेजस्वि नावधीतमस्तु । मा विद्विषावहै ।
॥ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः॥

**-o-O-o-**